# व्यक्ती आणि अपेक्षा

लेखक

श्री. गोविंद भिकाजी रानडे, बी. ए.

एकमेव विक्रेते :

**श्री समर्थ बुक डेपो**

गिरगाव, - - - मुंबई ४

१९४७

[किंमत २। ०

# मी —

१९३५ सालीं लेखक या नात्यानें मी साहित्य-क्षेत्र नांगरू लागलों. याचा अर्थ असा नव्हे कीं, मी 'साहित्य-क्षेत्रावरून नागर फिरवूं लागलों !' सतत बारा वर्षें म्हणजे तब्बल एक तप तपश्चर्या केल्यावर माझ्या साहित्य-वेलीला 'व्यक्ती आणि अपेक्षा' या नांवाचें एक फळ आलें आहे. हें फळ गोड आहे, कडू आहे, तुरट आहे, की आंबट आहे, हें पाहाण्याचें काम माझें नाहीं. आपल्यासारख्या प्रेमळ रसिकाचें आहे. आणि त्याचबरोबर चोखंदळ टीकाकारांचें आहे. हे फळ गोड असून याची माधुरी अवीट आहे, तोंडाची मिठी जात नाहीं, असें कोणीं म्हटलें तर मला त्यांत आनंदच होईल, आणि का बरें होऊं नये ? परंतु हें फळ कडू आहे, तुरट आहे, असा अभिप्राय एकाद्या चिकित्सकानें दिला तरी विश्वामित्र मुनीप्रमाणें 'हें फळ काय मम तपाला ?' ही काव्यपंक्ति दंताड उघडून आणि कपाळावर निराशेनें अगर वैराग्यानें हात मारून मी म्हणणार नाहीं, किंवा दुर्वास ऋषीप्रमाणें रौद्रावतार धारण करून हमरी तुमरीवर किंवा एकेरीवर येऊन कोणासही शिव्याशाप देणार नाहीं. कारण Taste differs हें सर्वांना विदित आहेच.

कोणत्याही शुभ आणि मंगलदायक प्रसंगीं प्रारंभीं श्री. गजाननाची प्रतिष्ठापना करून मगच त्या कार्यास आरंभ करावयाचा अशी सनातनी आणि चागली रूढी आहे. मी प्रांजलपणें कबूल करतों कीं मी जरी भस्माचे पट्टे लावून अष्टौप्रहर स्नानसंध्यापूजादि धार्मिक कार्यांत गुरफटून जाणारा वैदिक ब्राह्मण नाहीं, तरी वृत्तीनें आणि आचारानें मी पूर्ण सनातनीच आहे; आणि म्हणूनच सनातनी चालीस स्मरून माझ्या ‘ व्यक्ती आणि अपेक्षा ’ या संग्रहांत श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर याना मीं प्रथमचे स्थान दिलें आहे. हें सांगायचा उद्देश एवढाच कीं संग्रहांतील इतर व्यक्तींनी रागाऊन ‘ पंक्तिप्रपंच ’, ‘क्यू’मध्यें वशिलेबाजी वगैरे आरोप माझ्यावर करूं नयेत !

या संग्रहांतील व्यक्तींवर मीं जे लेख लिहिले आहेत ते सद्हेतूपूर्वक आणि निर्विकार मनानें लिहिले आहेत. ह्या संग्रहांतील व्यक्ती जर लक्षांत घेतल्या तर त्यांतील कांहींची आणि माझी दाट ओळख आहे. त्यांच्या घरीं माझें जाणें येणें आहे. काहीं व्यक्तींशीं नमस्कारापुरतीच किंवा तोंड जरासें हलवून हॅ हॅ करण्याइतकीच जानपछान आहे. आणि काहींची आणि माझी अद्यापपर्यंत गांठ देखील पडली नाहीं ! मला जें मनापासून वाटत होतें आणि अद्यापिही वाटत आहे, त्या विचारांना या संग्रहांत वाचा फुटली आहे इतकेंच ! यांतील कांहीं व्यक्तींची मीं स्तुती केल्यामुळें माझ्या वर ‘ भाटागिरी’चा आरोप येणें शक्य आहे, आणि कांहीं व्यक्तींवर मीं टीकेचें शस्त्र उगारल्यामुळें त्या व्यक्ती आणि त्यांचे भगतगण माझेवर रागावतीलही. पण कोणत्याही वादविवादाच्या धुळवडींत शिरून होळीचा होळकर बनण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं ! आणि मनापासून मला वादविवादाच्या धुळवडींतील शाब्दिक चिखलफेकींत अंग बरबटून घेण्याची, कांहीं प्रसिद्धीभिक्षुकांप्रमाणें संवयही नाहीं.

ह्या संग्रहाला कोण्या तरी दुढ्ढाचार्य साहित्यिकाची प्रस्तावना घ्यावी असा सल्ला माझ्या कांहीं स्नेह्यांनीं दिला. परंतु प्रस्तावना मागावयास गेल्यावर या दुढ्ढाचार्य साहित्यिकांचा भाव टाटा डिफर्डप्रमाणें वाढतो आणि मग ते ज्या कांहीं बायकी सबबी सांगतात, त्या कांहीं विचारूं नका. आणि मग 'प्रस्तावना नको पण साहित्यिक आवर' अशी पाळी आपल्यावर येते. मला हा अनुभव पुष्कळाच्या तोंडून ऐकूं आल्यामुळें या दुढ्ढाचार्यांच्या वाटेला सुद्धां जायला नको असें ठरवून, या संग्रहाला प्रस्तावनेचा स्पर्श होऊं द्यायचें मीं अजिबात टाळलें ! दुढ्ढाचार्य साहित्यिकाची प्रस्तावना घेऊन पुस्तक प्रसवणारा लेखक् एका धोंड्यानें दोन पक्षी मारीत असतो. दुढ्ढाचार्य साहित्यिकाची प्रस्तावना घेतली म्हणजे पुस्तकाच्या खपाला मदत होते हा एक फायदा, आणि दुसरा फायदा असा कीं, दुढ्ढाचार्यानें प्रस्तावना दिली असल्यामुळें काय बिशाद आहे त्या पुस्तकावर टीकेचा हल्ला होण्याची ! एका धोंड्यानें दोन पक्षी मारण्याची ही हातचलाखी मीं वरील कारणांसाठींच जाणूनबुजून केली नाहीं. प्रस्तावनेच्या ठेकेदारांचा मीं एक 'चान्स' घालवला याबद्दल ते माझ्यावर रागावणार नाहींत अशी आशा आहे.

पान १३ वर ८ व्या ओळींत 'मामा भटांना' या ऐवजीं नुसतें 'भटांना' असें वाचावें.

हा संग्रह प्रसिद्ध होत असतांना ज्या माझ्या स्नेह्यांनीं मला साह्य केलें त्यांचा, हा संग्रह प्रकाशित करण्याची जबाबदारी शिरावर घेतली याबद्दल या संग्रहाच्या प्रकाशकांचा, संग्रहाच्या छपाईचें काम त्वरित करून दिल्या-बद्दल मुद्रकांचा-संग्रहाच्या कव्हरवरील चित्र सुबक रीतीनें काढून दिल्या-बद्दल चित्रकारांचा–आणि हा संग्रह प्रसिद्ध करण्याची आपल्या कर्तृत्वानें मला संधि प्राप्त करून दिली याबद्दल या संग्रहांतील व्यक्तींचा मी फार फार ऋणी आहें. या आभाराच्या यादींत कुणाचे आभार मानावयाचे राहून गेले असल्यास क्षमस्व !

अखेर, ज्यानें माझे बुद्धिस्थानीं वसति करून हा संग्रह माझ्याकडून लिहविला त्या विश्वंभराला अनन्यभावानें शरण जाऊन हें प्रास्ताविक आटोपतें घेतों.

काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें ।
परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥

| | | |
|---|---|---|
| ६२३।२० सदाशिव,<br>देशमुख वाडी, पुणें शहर. | } | गोविंद भिकाजी रानडे |

---

# अनुक्रमणिका

# १ : ग. त्र्यं. माडखोलकर

मी जेव्हां जेव्हां माडखोलकरांसंबंधीं माझ्या मित्राजवळ बोलायला लागतों, तेव्हां तेव्हां माझा मित्र– 'तुझा तो महाखोडकर ना ?' असें म्हणून मलाच गप्प बसायला लावतो. 'माडखोलकर' या उपनांवाचें विडंबन करून त्यांना 'महाखोडकर' म्हणण्याचा उपद्व्याप करण्यांत वास्तविक मला कांहींच औचित्य वाटत नाहीं. कारण ते कांहीं शामराव ओकांप्रमाणें कोणास 'कोपरखळ्या' मारीत नाहींत; किंवा दत्तु बांदेकरांप्रमाणें कोणाशीं 'अति-प्रसंगही' करीत नाहींत. तेव्हां त्यांना त्यांच्या खऱ्या नांवानेंच 'हांका' मारण्यांत खरें स्वारस्य आहे.

मराठी साहित्य-क्षेत्रांतील श्री. तात्यासाहेब केळकर, कै. प्रो. वामन मल्हार जोशी, श्री. अप्पासाहेब फडके, श्री. भाऊसाहेब खांडेकर, आचार्य अत्रे, आणि मामा वरेरकर या प्रथमश्रेणींतील साहित्यिकांच्या पंक्तींत पाटाला पाट लावून बसण्याचा माडखोलकरांना हक्क आहे. उपरिनिर्दिष्ट पंक्तींतील प्रत्येकाचा 'वृत्तपत्रसृष्टीशीं' निकटचा 'संबंध' किंवा 'घरोबा' म्हणा हवें तर, घडून आलेला आहे. श्री. तात्यासाहेब केळकर आपल्या मोठेपणाची सदैव गर्जना करणाऱ्या 'केसरी'चे संपादक होते. कै. वामनराव जोशी हे कै. प्रो. विष्णुबुवा विजापुरकरांच्या 'विश्ववृत्त' या मासिकांत उपसंपादक होते. आप्पासाहेब फडके यांच्या साहाय्याखालीं 'झंकार' वाचकांना उच्च साहित्य पुरवीत आहे ! अत्र्यांच्या 'नवयुग'नें तसलें वाङ्मय पुरविण्याचा विडाच उचलला आहे. खांडेकरांच्या संपादकत्वाखालीं 'ज्योत्स्ना' पुरोगामी वाङ्मयाचें मार्गदर्शन करीत होती. आणि मामांच्या 'पूर्णिमे'ची जरी अल्पकाळांत 'अमावास्या' झाली,

तरी संपादक म्हणवून मिरवून घेण्याचा आणि त्यामुळेंच पत्रकार-परिषदेंत बसण्याचा 'चान्स' त्यांना मिळाला आहे. माडखोलकरही नागपूरच्या 'महाराष्ट्रात' सह-संपादक होते. आणि आतां तर त्यांनीं स्वतःच्या संपादकत्वाखालीं 'तरुण भारत' सुरू केलें आहे.

पुण्यांतील महाराष्ट्र-शारदा-मंदिराच्या एका वार्षिक संमेलनप्रसंगीं माडखोलकरांना प्रथमच पाहण्याचा व त्यांचें भाषण ऐकण्याचा सुयोग मला प्राप्त झाला. त्यानंतर मी त्यांचें भाषण मला वाटतें पुण्यांत वार्षिक भरणाऱ्या वसंत-व्याख्यान-मालेंत ऐकलें. आणि नंतर त्यांचें भाषण श्रवण करण्याची संधि पुण्यांतील नगर-वाचन-मंदिराच्या वाढदिवसप्रसंगीं ते अध्यक्ष या नात्यानें बोलले तेव्हांच मिळाली. माडखोलकरांचीं हीं भाषणें मीं जशीं प्रत्यक्ष ऐकलीं आहेत, तशीच त्यांच्या भाषणाची निघालेली 'पुस्तिका' सुद्धां मीं वाचली आहे. माडखोलकरांच्या लंबायमान भाषणांत श्रोत्यांवर विद्वत्तेची छाप पाडण्याकरितां केलेल्या संस्कृतप्रचुर शब्दांची कितीही 'भाऊगर्दी' असली, तरी श्री. पु. मं. लाड यांच्या संस्कृतप्रचुर शब्दाचें लालित्य त्यात दिसून येत नाहीं. माडखोलकर फडक्यांप्रमाणें जरी मुद्देसूद बोलत असले, तरी फडक्यांच्या भाषणांतील रसाळपणाचा माडखोलकरांच्या भाषणांत 'ठणठणाट' असतो! त्याच्या भाषणावर 'बर्क'( Burke ) च्या भाषणांची छाप पडलेली असावी असा माझा तरी समज आहे.

कै. हरीभाऊ आपटे यांची 'यशवंतराव खरे', श्री. ना. ह. आपटे यांची 'सुखाचा मूलमंत्र', प्रो. फडके यांची 'दौलत', खांडेकरांची 'दोन ध्रुव' किंवा साने गुरुजींची 'श्यामची आई' या कादंबऱ्यांना कादंबरी-वाङ्मयांत जें चिरस्थान आहे तेंच माडखोलकर यांच्या 'मुक्तात्मा' या राजकीय कादंबरीलाही आहे. परंतु वर सांगितलेल्या कादंबऱ्या गाजल्या त्या त्यांतील कथानकांची सुंदर गुंफण आणि त्यांतील इतर वाङ्मयीन गुणांमुळें! मात्र 'मुक्तात्मा' गाजली ती तिच्या राजकीय पार्श्वभूमीमुळें, आणि बुरख्याआड तोंड लपवून हल्ला करणाऱ्या व्यक्तींच्या तोंडावरील बुरखा ओढून काढण्याचा माडखोलकरांनीं प्रयत्न केल्यामुळें!! त्यांच्या या पहिल्याच कादंबरीनें समाजांत इतकी खळबळ उडवून दिली कीं,

कादंबरीकार या नात्यानें त्यांनीं आपलें नांव चांगलेंच गाजवलें. प्रस्तुत कादंबरींत रेखाटलेल्या साम्यवादोच्या चित्राइतकें साम्य असलेलें हुबेहुब चित्र दुसऱ्या एकाद्याच कादंबरींत आढळून येईल ! या कादंबरींतील भाषा जरी सफाईदार असली तरी माडखोलकरांच्या संस्कृतप्रचुर शब्दाच्या विलक्षण हव्यासामुळें वाचकांना कित्येक ठिकाणीं विश्रांति घेऊन-- व पाण्याचे घोट घेत घेतच ( चषकांतील मादक पेयाचे नव्हेत ) पुढें मार्ग आक्रमावा लागतो. आपणासही राजकारण येतें हें कादंबरींत दाखविण्याची फॅशन ' नुकतंच कुठं लिहूं लागला आहे ' अशा एकाद्या कुमार साहित्यिका-पासून तो खंडांनीं साहित्य पुरविणाऱ्या साहित्य-सम्राटापर्यंत बोकाळली आहे. माडखोलकर महाशय देखील या साथीला बळी पडले !– आणि याचमुळें त्यांच्या ' मुखवटे ' आणि ' कांता ' या राजकीय कादंबऱ्यांचा 'लोकशाही स्वराज्य पक्षा'च्या राजकीय कार्यक्रमासारखा बेंडबाजा वाजला ! यानंतरची वाचकांना आवडलेली पण सरकारची इतराजी झालेली ' नवे संसार ' ही माडखोलकरांची कादंबरी. माडखोलकरांनीं ' नवे संसार ' ही कादंबरी जेव्हा लिहिली तेव्हां ' नव्या युगा 'तील कादंबरीशीं त्यांनीं ' नवा संसार ' सुरू केला आहे असें मला वाटलें. पण त्या संसाररूपी रथाचा ' पुणेरी टांगा ' झालेला पाहून त्यांच्या नव्या संसारप्रसंगीं उधळलेल्या स्तुतीच्या अक्षता वाया गेल्या हें कळून मात्र मी खिन्न झालों.

यानंतर माडखोलकरांनीं दोन ' भयंकर ' कादंबऱ्या खरडल्या ! ' डाक-बंगला ' आणि ' नाग-कन्या ' या त्या कादंबऱ्या होत. या दोन्ही कादं-बऱ्यांतील नागवीं उघडीं प्रणयवर्णनें माझ्या विधानाच्या पुष्ट्यर्थ दाखवा-यचीं म्हणजे चिखलांत दगड टाकून स्वतःच्या अंगावर चिखल उडवून घेण्यासारखें असल्यामुळें मी त्या दिशेस वळतच नाहीं. मी फक्त त्या दोन चोपड्यांची तुलना ' जीवन ' आणि ' सवाई जीवन ' या अश्लील विषयाला वाहिलेल्या मासिकांशीं करतों. म्हणजे मला अंतर्यामीं काय सांगायचें आहे तें आपल्या लक्षांत येईलच ! ' पराक्रमानंतर प्रणय आणि पराक्रम करून प्राणार्पण ' हें ' प ' या आद्याक्षरावर अधिष्ठित झालेलें सूत्र माडखोलकरांच्या गांवींही नाहीं असें मला वाटतें. या दोन चोपड्यांतील नायक– एक

पैशाची पानपट्टी खाऊन, वर एक पैशाची पिला हस्ती शिलगावून, आड-गल्लीपाशीं मिळणारा पैशाचा अत्तराचा बोळा कानांत घालून, आणि पैशाचा मोतियाचा गजरा हुंगत, एक आण्यांत चैन करीत 'व्हाइटलेन' मधून काळीं तोंडें पाहात भटकणाऱ्या आणि हुंगेगिरी करणाऱ्या उडाण-टप्पूंप्रमाणें वाटतात. या दोन्ही कादंबरींतील नायक एखाद्या डाक-बंगल्यांत उतरतात काय–त्यांना छटेल छोकऱ्या भेटतात काय - ते चषकांतील मादक पेयें पितात काय– नग्नांगानें पोहतात काय– सारें सारें कांहीं विलक्षणच !

रातराणींच्या फुलांचा सुगंध कितीही उन्मादक वाटला तरी तहानभूक विसरून तोच सारखा घेत राहावें असें कोणाला बरें वाटेल ? आणि वाट-ल्यास सदर इसमाची रवानगी येरवड्यासच करावयास नको काय ? ब्रँडीच्या चार थेंबानीं जरी हुषारी वाटत असली तरी ती चषकात ओतून चषकावर चषक रिकामे करण्याऱ्याला काय कोणी चागलें म्हणेल ? माड-खोलकर, आपण उन्मादक कादंबऱ्या लिहून वाचकांच्या आधींच उफाळ-लेल्या लैंगिक विषयावरील वाङ्मयाच्या आवडीला हातभार लावलात ! आपलें असलें लिखाण वाचून ही कामदेवाची परंपरा इतक्या खालच्या थराला गेली आहे कीं शाळा-कॉलेजच्या पोरांच्या कामविषयक गोष्टीही मासिकांतून धडधडीत प्रसिद्ध होत आहेत. मी कांहीं कृष्णराव मराठ्यां-प्रमाणें शृंगाराला अस्पृश्यासारखें समजून दूर पळणारा सोंवळा ब्राम्हण नाहीं– किंवा आपल्या 'घरांत' 'होम' कुंड पेटत ठेवणारा आग्यारीं-तील अहिताग्नि नाहीं. पण मोबदल्यांत मिळणाऱ्या रुपयांच्या नादमधुर आवाजावर कामोत्तेजक लिखाण लिहिणारे नाग हें विष समाजात सांथी-प्रमाणें फैलावीत आहेत हा धोक्याचा इषारा देणें या प्रसंगानें इष्ट आणि अगत्याचें वाटतें ! महायुद्धाचा युरोपमध्यें भडका उडाला असतांना आणि त्या झळीनें हिंदुस्थानांत चटके बसत असतांना, कामुक विषयांची चर्चा करण्याचे दिवस दुसऱ्या बाजीरावाबरोबरच संपून गेले, हें माडखोलकर, त्या वेळीं आपल्या लक्षांत यावयास हवें होतें. महात्माजींना व कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना त्यावेळीं अटकेंत टेवल्यामुळें जी चळवळ सुरू झाली होती त्या

वेळीं वास्तविक आपणांसारख्या श्रेष्ठ दर्जाच्या साहित्यिकानें असलें वाङ्मय न निर्माण करतां ज्यायोगानें हिंदुस्थानांत अनेक जयप्रकाश नारायण, अनेक अच्युतराव पटवर्धन निर्माण करतां येतील असें ओजस्वी– स्वदेशाभिमानानें ओतप्रोत भरलेलें साहित्य निर्माण करावयास हवें होतें ! माडखोलकर, आम्ही जेव्हां आपल्यापाशीं 'संदेश द्या' अशी मागणी करतों तेव्हां आपले स्नेही आमच्यावर गुरगुरत येतात व 'माडखोलकर कथाकार आहेत. ते तुम्हांला त्यांच्या इच्छेप्रमाणें स्फुरलेली कादंबरी देतील. समर्थांप्रमाणें संदेश देणार नाहींत.' असें प्रतिपादून वर 'A much discussed writer is a popular one' असें आपल्यासंबंधीं मत झोकून देतात ! पण समर्थांवर गुरगुरणाऱ्यांना वरील विधानाची दुसरी बाजूच ठाऊक नसावी, असा माझा समज आहे. 'A much discussed writer is a notorious one.' ही ती दुसरी बाजू होय ! !

आतांपर्यंत मी माडखोलकरांच्या कादंबरी-वाङ्मयाचें विवेचन केलें ! आणि मला लिहिण्यास खेद वाटतो कीं माडखोलकर 'मुक्तात्मा' या कादंबरीनें वाचकांच्या जितके डोळ्यांत भरले– तितकेच त्यांच्या नंतरच्या कादंबऱ्यांनीं; ते वाचकांच्या दृष्टीपुढून अंतर्धान पावले ! कादंबरीकार या नात्यानें वाचकांनीं त्यांच्याबद्दल ज्या अपेक्षा मनाशीं बांधल्या होत्या त्यांचा अल्पावकाशांतच अगदीं चक्काचूर झाला !

आतां उरलेल्या लेखाच्या उत्तर-भागांत मी माडखोलकरांच्या मौलिक वाङ्मयाचा परामर्ष घेणार आहें आणि त्याबद्दल माझ्या त्यांच्याबद्दलच्या अपेक्षा काय होत्या आणि त्या त्यांनीं कितपत पुऱ्या केल्या याचा सांगोपांग विचार करणार आहें.

पाश्चिमात्य आणि प्राचीन टीकाशास्त्राचा व उत्कृष्ट टीकाकारांच्या कृतींचा सशास्त्र अभ्यास करून माडखोलकरांनीं 'आधुनिक कविपंचक' आणि 'विलापिका' या कवींवरील आणि काव्यावरील टीका, टिप्पणी लिहिल्या. पण माडखोलकरांमधील तो अभ्यासू 'टीकाकार' आजकाल लुप्त होत असलेला पाहून आमच्यावर, म्हणजेच मराठी भाषेच्या अभिमान्यांवर, खरोखरच 'विलाप' करण्याची पाळी आली आहे ! माडखोलकरांनीं

शास्त्रीबुवांच्या ‘ संस्कृत कविपंचक ’ या ग्रंथाचें नांवच केवळ नव्हे, तर त्यांतील शास्त्रीबुवांची चिकित्सक शैलीही आत्मसात् केल्याचें त्यांच्या ‘ आधुनिक कवि-पंचक ’ या पुस्तकांतील ‘ गोविंदाग्रजांची कविता ’ हा प्रबंध वाचतांना दृष्टीस पडतें. गोविंदाग्रज, विनायक, ना. वा. टिळक, यांच्या काव्यांतील सुंदर आणि निवडक उतारे देऊन त्यांच्या गुणदोषांची चर्चा माडखोल-करांनीं व्यापक दृष्टिकोनांतून केली आहे. “ शंकराच्या डमरूंतून ज्याप्रमाणें वर्णमाला निर्माण झाली, त्याचप्रमाणें समुद्राच्या लाटांतून वैलापिक वृत्ताचा ( Elegiac Verse ) उदय झाला. ” हे विलापिकेसंबंधीं माडखोलकरांनीं काढलेले उद्गार अगदीं समर्पक आहेत. अजविलाप, करुणविलाप, वगैरे विलापांची माडखोलकरांची माहिती, त्यांची अभ्यासू आणि संशोधक वृत्ति दाखवते, तर ‘ ग्रे ’ ची ‘ एलेजी ’ टेनिसनची ‘ इन मेमोरियम ’ या काव्यां-वरील त्यांचीं परीक्षणें त्यांचें पाश्चात्य काव्याचें मार्मिक रसग्रहण दर्शवितात.

‘ माझे आवडते कथालेखक ’ हें माडखोलकरांनीं लिहिलेलें एक उत्कृष्ट परिचय-परामर्शात्मक पुस्तक आहे. या पुस्तकांतील ‘ अच्युतराव कोल्हटकर ’ ‘ दोन तात्या ’, ‘ बॅ. सावरकर ’– ‘ मोर्ले ’ या व्यक्तींवरील लेखांसारखीं व्यक्तिचित्रें माडखोलकर आजकाल लिहीत नाहींत, म्हणून ‘ आमच्या आवडत्या लेखकांतून ’ मात्र कांहीं दिवसांनीं माडखोलकरांना वगळण्याची पाळी आमच्यावर येणार नाहींना, अशी शंका वारंवार मला टोंचत असते.

‘ अवशेष ’मधील माडखोलकरांची आयर्लंडवरील लेखमाला त्यांच्या ध्येय-वादाचीच निदर्शक आहे. ‘ मीं शेगांवला काय पाहिलें ? ’ हा गांधीवादांतील ढोंगीपणाला चव्हाट्यावर आणणारा लेख टीकेचें एक उत्तम उदाहरण म्हणून दाखवितां येईल. ‘ ज्योतिर्भूषण सेन ’ यांचें माडखोलकरांनीं रंगविलेलें व्यक्ति-चित्र माडखोलकर व्यक्तिचित्र किती आत्मीयतेनें आणि तळमळीनें रंगवूं शकतात याचा पुरावा आहे.

माडखोलकरांनीं मराठी भाषा किती कमावली आहे याचें एकच उदाहरण मी येथें देतों. पुणें–मुंबई हीं शहरें कलावंतांचीं आहेत व नागपूर शहर मर्दानी आहे हें दाखवून ते म्हणतात, ‘ पुण्याला काय किंवा मुंबईला काय व्याही-भोजनाच्या वेळीं अशी सुरेल पंगत वाजविणारे सनईवाले आहेत कीं,

त्यांची मंजुळ रागदारी चालू झाली म्हणजे जेवणाराचें भान हरपून तोंडांतला घांस तोंडांत आणि पानांतला पानांतच राहून जातो. सनईची सुरेल रागदारी आणि चौघड्याचें सुरेल वादन या शहरांत नाहीं. इथें ताशाच्या कडकडाटांत ' राधे कृष्ण बोल ' आणि ' मेरे मौला बुला ' ऐकायला मिळेल तेवढेंच. "

' स्वैर–विचार ' या माडखोलकराच्या पुस्तकांतील ' टिळक फासिस्ट कां झाले नसते ? '—— ' सावरकर पुरोगामी आहेत काय ? ' व ' उर्वशी ' हे लेख प्रबंध–वाङ्मयांत उत्कृष्ट प्रबंध म्हणूनच गाजतील. माडखोलकरानीं या दर्जाचें प्रबंधवाङ्मय लिहिण्याचें सोडलें तर मात्र त्यांच्या वाङ्मयाचे ' अवशेष ' तरी भावी पिढीला सांपडतील कीं नाहीं याची मला जबरदस्त शंका आहे.

माडखोलकरांनीं लिहिलेल्या आणि चरित्र-वाङ्मयांत नांवाजलेल्या ' चिपळूणकर चरित्रा 'ला ते जर पदवीधर असते तर मुंबई विद्यापीठाचें तर्खडकर पारितोषिक त्यांना खासच मिळालें असतें. या चरित्राला चरित्रात्मक निबंध असेंच म्हणावें लागेल. हें चरित्र एका दृष्टीनें अपुरें आहे असें मला वाटतें. कारण चरित्र-नायकाच्या चरित्राबरोबरच त्या नायकाच्या आयुष्यांतील कांहीं गमतीदार प्रसंगांचा उल्लेख झाला तर त्या चरित्राची गोडी अवीट राहते. कै. बापूराव आंब्रेकर यांनीं लिहिलेलें ' हरिभाऊ आपटे ' यांचें चरित्र चरित्र-लेखनाचा एक आदर्श नमुना म्हणून समजावें लागेल. त्यांतील एका प्रसंगाचा त्यांनीं केलेला उल्लेख गमतीदार आहे. सहज आठवला म्हणून सांगतों. हरिभाऊ आपट्यांनीं एकदां एका वेश्येच्या खोलीचें वर्णन करतांना तेथल्या वाद्यांसंबंधींचा उल्लेख आपल्या एका कादंबरींत केला आहे. ' डग्गा व बाह्या ' असें तबल्याचें वर्णन त्यांनीं केलें आहे. पण हे समानार्थींच शब्द असल्यामुळें हरिभाऊ आपट्यांची झालेली चूक एका वेश्येनेंच ओळखली. शास्त्रीबुवांवरील चरित्रासारखीं आणखी कांहीं चरित्रें माडखोलकरांनीं लिहिलीं असतीं तर, जॉन्सनचें चरित्र लिहिणारा ' बॉस्वेल ' किंवा ग्लॅडस्टनचें चरित्र लिहिणारा ' मोर्ले ' यांच्याप्रमाणेंच चरित्रकार म्हणून माडखोलकर गाजले असते !

श्री. गोविंदराव टेंबे हे साहित्यिक आणि एक उत्कृष्ट पेटी वाजवणारे म्हणून प्रसिद्ध असले तरी, ते आम्हांला पेटी-वादनकार म्हणूनच हवे आहेत. खंड्या रांगणेकर बॅडमिंटन मॅचेसमध्यें जरी चॅम्पियन आला तरी टोल्यावर टोले लगावणारा हिंदुस्थानांतील पहिलाच डावखोरा क्रिकेटिअर असा त्याचा बॉबी तल्यारखानांच्या ' माइक 'मधून जगजाहीर होणारा लौकिक ऐकण्यासच आम्ही सदैव सिद्ध आहोंत. अगदीं याचप्रमाणें ' गजानन त्र्यंबक माडखोलकर ' हे कादंबरीकार म्हणून नांवाजण्यापेक्षां एक उत्कृष्ट टीकाकार म्हणून गाजोत अशी माझी व मराठी वाचकांची अगदीं मनापासूनची अपेक्षा आहे.

## २ : विश्राम बेडेकर

मराठी साहित्यक्षेत्रांत ‘ प्रसिद्धि-भिक्षुक ’ आणि ‘ प्रसिद्धि-पराङ्मुख ’ असे साहित्यिकांचे दोन पंथ आहेत. पहिल्या पंथांतील लोकाची यादी मीं जर देण्याचें ठरवलें तर मला वाटतें या लेखाचें एक पानच त्याला खर्ची पडेल ! माझ्या वाचकांना याबाबत अधिक औत्सुक्य वाटत असल्यास त्यांनीं कोणत्याहि साहित्य-संमेलनाचे वेळीं प्रसिद्ध झालेल्या ‘ ज्ञानप्रकाश ’च्या रिपोर्टातील हजर असलेल्या ठराविक लोकांची ठराविक ठशाची यादी एकवार चाळून पाहण्याचे श्रम घ्यावेत !

दुसऱ्या पंथांत माझ्या माहितीप्रमाणें फारच थोडे लोक मोडतील. या वर्गांत ज्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल अशी व्यक्ति म्हणजे ‘ विविधवृत्त ’ या साप्ताहिकाचे सहसंपादक श्रीयुत चं. वि. बावडेकर हे होत ! त्यांनीं आजपर्यंत नांवाखालीं आणि टोपणनांवावर इतकें विपुल लिखाण लिहिलें आहे कीं साहित्य-सम्राटांचे खंड सुद्धां कमीच भरतील. याच वर्गांत ज्यांचा नंतर उल्लेख करतां येईल असे एक साहित्यिक म्हणजे यवतमाळचे श्री. वामन नारायण देशपांडे हे म्हणतां येतील ! ! ‘ रामशास्त्री ’ या टोपण-नांवाखालीं श्री. मोटे यांच्या ‘ प्रतिभेंत ’ लिहिलेले मौलिक लेख वामनराव देशपांड्यांनींच लिहिले आहेत हें ‘ मनोहर ’च्या १९४३ च्या ‘ जानेवारी ’ अंकांत लोकांना कळलें. आठ वर्षें ‘ रामशास्त्री ’ म्हणून अज्ञातवासांत ते राहिले यांतच त्यांची प्रसिद्धि-पराङ्मुखता दिसून येत नाहीं काय ? या पंथांतील तिसरे मानकरी, कीं ज्यांचा उल्लेख ‘ अपटुडेट जंटलमन् ’ असा मी करीन, असे ‘ पहिला पाळणा ’ हलविणारे विश्वनाथ चिंतामण उर्फ विश्राम बेडेकर हे होत.

विश्राम बेडेकरांच्या 'रणांगण' या सर्वोत्कृष्ट कादंबरीला दक्षिण महाराष्ट्र साहित्य-पुरस्कार समितीनें प्रो. फडके पारितोषिकांतील जें दुसरें पारितोषिक दिलें तें अगदीं यथार्थ होतें असें माझ्याप्रमाणें इतरांनाही वाटेल. वाचकांच्या अंतःकरणाला थरारून सोडणारी आणि त्यांच्या हृदयाचा ठाव घेणारी कादंबरी नांव गुप्त ठेवून प्रसिद्ध करणाऱ्या कादंबरीकारास कोण प्रसिद्धि-पराङ्मुख म्हणून म्हणणार नाहीं ?

उगीचच पुढेंपुढें करून, नाहीं त्या विषयावर वाद माजवून, आमंत्रण येईल त्या सभेचें अध्यक्षस्थान आधाशीपणें स्वीकारून, आणि तोंडातील लेखणीसकट स्वतःच्या फोटोचें वेळीं अवेळीं वर्तमानपत्रांत प्रदर्शन करून 'चीप पब्लिसिटी' मिळवणाऱ्या कांहीं भिक्षुक-वृत्तीच्या साहित्यिकांत विश्राम बेडेकर सामावत नाहींत यांतच त्यांचें व्यक्तिमत्व प्रकर्षानें प्रकट होतें असें मला प्रामाणिकपणें वाटतें.

विश्राम बेडेकरांनीं वाङ्मय-प्रांतांतील मुशाफरीचा पहिला टप्पा नाटक-काराच्या रूपानें गांठला. त्यांच्या 'ब्रह्मकुमारी' या पौराणिक नाटकाचा प्रथमप्रयोग 'बलवंत संगीत मंडळी'नें सांगलीस १९३३ सालीं केला. श्री. चिंतामणराव कोल्हटकर, कै. मास्तर दीनानाथ, श्री. गणपतराव मोहिते (हल्लींचे अविनाश !) इत्यादिकांनीं त्यांत महत्त्वाच्या भूमिका केल्या होत्या.

'अहल्या, द्रौपदी, सीता, तारा, मंदोदरी...' या प्रातःस्मरणीय पंचकन्यांपैकीं पहिली 'ब्रह्मकुमारी अहल्या' हिची कथा मुख्यतः या नाटकांत रंगवली असून, बृहस्पतीची पत्नी तारा हिची कथा उपकथात्मक म्हणून जोडण्यांत आली आहे. अहल्या आणि तारा यांच्या वैवाहिक जीवनांत उत्पन्न झालेले गुंतागुंतीचे प्रश्न एकमेकींना पूरक असल्याचें दिसल्यानें एका विवाहकथेंतून दुसरी विवाहकथा बेडेकरांनीं रंगवली आहे.

"कळत न कळत इंद्राकडून भ्रष्ट झालेल्या अहल्येचा गौतमानें स्वीकार केला, आणि चंद्रापासून मुलगा झाला असतांही पत्नीला पुनः स्वीकारण्यास बृहस्पतीची तयारी होती, या जुन्या कथानकाला आधुनिक नाटकाचें स्वरूप देण्यापलीकडे यांत कांहीं नाहीं.—" असें जरी बेडेकरांनीं 'ब्रह्मकुमारी'च्या

प्रस्तावनेंत आपल्या नेहमींच्या विनयवृत्तीनें म्हटलें असलें तरी, त्यांनीं कांहीं पात्रांच्या तोंडीं योजिलेलीं भाषणें म्हणजे समाजाच्या डोळ्यांत झणझणीत अंजनच आहे असेंच मी तरी म्हणेन. पैशाच्या लोभानें श्रीमंत जरठांशीं लग्न लावून मुलींच्या गळ्यांत मंगलसूत्र बांधण्याऐवजीं त्यांचा गळा कापणाऱ्या बेजबाबदार बापांना "हीं दगडी हिरेमाणकं—असल्या वैभववंतांच्या भांडारखान्यांत रचून ठेवलेलीं, त्यांच्या पातकांची सुंदर मोजमापंयांपैकीं एकएक आपल्या कन्येच्या अंगावर चढवूं पाहणं म्हणजे तिच्या हृदयाचा वध करून त्या प्रेतावर सुंदर खरी, पण समाधि रचीत जाणं होय." —— या वाक्यांनीं दिलेला जमालगोटा शेवटीं परिणामकारक ठरल्यावाचून खास राहणार नाहीं. "इतिहास—पुराणांच्या मढ्यांनीं आंवळलेल्या बाहुपाशांत, रूढमार्गी आईबापांच्या शिकवणुकीच्या शृंखलांत सामाजिक सुव्यवस्थेच्या नांवाखालीं किमान मर्यादेच्याहि व्यक्तिविकासाला बळी देणाऱ्या धर्ममार्तंडांच्या जाळ्यांत, जीं अनेक माणसांच्या मनासारखीं जिवंत मनं कैदेंत पडलीं आहेत, त्यांतली तूंहि एक अभागिनी आहेस."——या भाषणांतून बेडेकरांनीं दुष्ट रूढीस मुंगळ्याप्रमाणें चिकटून बसणाऱ्या आणि नवविचारांच्या लोकांना डसणाऱ्या भोंदू धर्ममार्तंडांना जो काडेचिराइताचा काढा पाजला आहे त्यानें तरी त्यांचा जुनाट रोग समूळ नष्ट झाला तरी मिळवली !

प्रस्तुत नाटकांतील भाषा ओघवती असून डौलदारपणांत ती नाट्याचार्य खाडिलकरांच्या एक रेसभरही मागें नाहीं असें माझें स्पष्ट मत नमूद करण्यास मला अभिमान वाटतो. "पहिलं नाजूक चुंबन ही जशी पुढच्या अधरखंडनाची प्रस्तावना, त्याप्रमाणें चंद्राचा किरणवर्षाव म्हणजे मदनबाणाच्या स्वारीची सुंदर स्त्रियांना सूचनाच नव्हे काय ?"— "पातिव्रत्याचं दैवत झालेल्या जगांतल्या भाग्यवान् पतींनो ! थुंका या लंपटाच्या स्त्रीमोहावर ! कुलाचं यशस्तेज वाढविण्याच्या आशेवर घुटमळणाऱ्या अतृप्त आत्म्यांनों, मोहामुळं कवडीमोल झालेल्या या भणंगाचं शापून भस्म करा !" अशा तऱ्हेच्या डौलदार भाषेचा आणि नवविचारांचा पूर या नाटकांतील प्रवेशा-प्रवेशांतून पसरलेला दिसतो. "तुमच्या कन्येसाठीं वाटेल तें दिव्य

करायला मी तयार आहें. आकाशावर वज्रप्रहार करून त्यामुळं कोसळून पड-णाऱ्या उल्का छातीवर झेलून दाखवीन आणि पृथ्वीच्या पोटांत बुडी मारून तिथून आणलेल्या अग्निरसात ते उल्कांचे दगड बसवून त्यांचें दिव्य मंदिर आपल्या कन्येला बांधून देईन "— हें वाचून बेडेकरांच्या कल्पनेची गरुड-भरारी गडकऱ्यांच्या वळणावर असल्याचें आपल्या प्रत्ययास येतें.

या नाटकातील स्वभाव-लेखन मात्र किंचित् सदोष आहे असें म्हणणें भाग पडतें. गौतम आणि बृहस्पती यांच्याबद्दल नाटकाच्या सुरवातीस आपणांस कांहींच आदर वाटत नाहीं. त्यांचीं भाषणें याहीपेक्षां जोरदार दिलीं गेलीं असतीं तर त्यांच्याबद्दलचा आदर निःसंशय दुणावला असता. दुष्यंताचें स्वभावचित्र मात्र एवढें स्वाभाविक साधलें आहे कीं त्याच्या दुष्टपणाची परमावधि पाहून स्टेजवर जाऊन त्याच्या नरडीचा घोट घ्यावा असें प्रेक्षकांना खचित वाटेल. नाटकांतील विनोद अगदींच सामान्य प्रतीचा आहे. संवादांत उलट-सुलट खटके जर जागजागीं पेरले असते, तर नाटकाला विनोदाची जोड मिळणें कांहीं तितकेंसें अशक्य नव्हतें. 'बलवंत संगीत मंडळी'च्या रंगभूमी-वर हें नाटक जरी 'रणदुंदुभि' इतकें गाजलें नाहीं, तरी नाटककाराला अवश्य असणाऱ्या कसबाचा सांठा विश्राम बेडेकराजवळ पुरेसा आहे इतकी तरी हें नाटक प्रतीति देतें.

युरोपांत असतांना बेडेकरांनीं 'रणांगण' ही उत्कृष्ट कादंबरी लिहिली. जिनोव्हा ते मुंबई यांच्या दरम्यानच्या जलप्रवासांत घडून आलेल्या रोमांच-कारी प्रणयप्रसंगांनीं ही कादंबरी रचली गेली आहे. या प्रकारची परदेशीय प्रवासात्मक अशी ही पहिलीच कादंबरी असून, ती लिहून कादंबरी वाङ्मयांत बेडेकरांनीं एक नवें दालन उघडलें असें म्हणण्यांतच या कादंबरीचा यथोचित गौरव केल्यासारखें होईल. "बॉब, तूं दाखविलेल्या काळ्या रेघांच्या चौकटींतील जाड मथळा आपल्या आशेचा मृत्युलेख होता! Britain is at war with Germany! आम्ही जर्मन पासपोर्ट बाळगणारे! आम्ही शत्रू! आम्हांला हिंदुस्थान बंद झालं! बॉब काल आपण सगळे स्नेही होतों. आज शत्रु झालों! दहा दिवस प्रीतीचे खेळ खेळलों. समुद्राच्या अंगणांत! आज सगळं रणांगण झालं!" 'रणांगण' या कादंबरींतील हार्टी

या नायिकेच्या पत्रांतील हा मजकूर म्हणजेच कादंबरीची मध्यवर्ती कल्पना आहे, कादंबरीचा गाभा आहे. "लाटा वरवर येत. त्यांच्या शिखरां-शिखरां-वरून होडगीं उड्या मारीत जात. झाडांवरच्या माकडांसारखीं भासत." अशा तऱ्हेचीं वर्णनें बेडेकरांची वर्णनशैली फडके–खांडेकरांच्या वर्णनशैलीच्या तोडीची आहे हें तर दाखवतातच. शिवाय त्या त्या प्रसंगाचें चित्र हुबेहुब डोळ्यांसमोर उभें करण्याची फडक्यांची हातोटीही बेडेकरांजवळ भरपूर प्रमाणांत आहे याचा प्रत्यय देतात.

१९३५ सालीं बेडेकरांनीं सांगलीच्या मामा भटांना जोडीस घेऊन 'भट-बेडेकर प्रॉडक्शन्स्' ही सिनेमा कंपनी काढली. 'ठकीचें लग्न' आणि 'सत्याचे प्रयोग' हे गडकऱ्यांच्या कथानकांवरील बोलपट काढून बेडेकरांनीं सिनेमा-जीवनाचा 'श्रीगणेशा' केला. हे बोलपट 'बॉक्स ऑफिस'च्या दृष्टीनें इतके आपटले कीं त्यांना 'श्री' प्राप्त होण्याऐवजीं त्यांच्या 'शिरीं' तोट्याचा बोजा मात्र विनाकारण बसला ! तरीपण बेडेकरांच्या अंगांत बोलपट काढ-ण्यास लागणारें कौशल्य असल्याची माझी समजूत झाली आणि दैवयोग असा कीं, पुढें ती खरीहि ठरली.

माझेच नव्हे तर हिंदुस्थानांतील बहुसंख्य सिनेमाशौकिनांचे आवडते दिग्दर्शक श्री. शांतारामबापू आपल्या बोलपटासाठीं गुणी माणसाची पारख कशी अचूक करतात हें त्यांनीं सौ. दुर्गा खोटे यांना आपल्या पहिल्याच 'अयोध्येचा राजा' या बोलपटांत जेव्हा प्रमुख नायिकेची, म्हणजेच तारा-मतीची, भूमिका दिली तेव्हां जसें दिसून आलें— किंवा श्री. ना. ह. आपटे यांचें 'कुंकू'चें कथानक घेतलें तेव्हां जसें आढळून आलें— किंवा 'माणूस' बोलपटाचे संवाद त्यांनीं श्री. अनंत काणेकर याचेकडून लिहून घेतले तेव्हां जसें समजून आलें;–– अगदीं तसेंच 'शेजारी'ची कथा त्यानीं बेडेकरां-कडून लिहवून घेतली त्यावेळीं दिसून आलें ! आढळून आलें ! आणि समजलेंहि ! 'शेजारी'च्या कथानकात बेडेकरांनीं चित्रित केलेला हिंदु-मुसल-मान ऐक्याचा प्रश्न इतका यशस्वी झाला कीं कांहीं प्रांतांतून या बोलपटास सरकारी कराच्या कचाट्यांतून मोकळें सोडलें ! यावेळीं बेडेकरांचा झालेला उत्कर्ष सहन न होऊन, वाङ्मयांतील कांहीं फुकट फौजदार पोटशूळ उठलेल्या

इसमांप्रमाणें फाल्गुनमास साजरा करीत म्हणूं लागले कीं, बेडेकरांनीं 'शेजारी'ची कथा श्री. वि. स. सुखटणकर यांच्या एक गोष्टीवरून चोरली आहे. कोणत्याही वेळीं बेडेकरांनीं जें लिहिलें त्या प्रत्येक खेपेस त्यांनीं दुसऱ्याचें ऋण जाणूनबुजून स्वीकारलेलें असल्यास तसा त्यांनीं प्रस्तावनेंतून स्पष्ट उल्लेख केलेला आहे. पण हें पाहण्याचें भान वाङ्मयचौर्याची राळ उठवणाऱ्या त्या फुकट फौजदारांना राहिलें नाहीं. बेडेकरांनीं या धुळवडींत भाग घेतला नाहीं यांत त्यांचा भ्याडपणा तर मुळींच नाहीं, तर उलट त्यांची प्रसिद्धिपराङ्मुखताच विशेषत्वानें प्रकट होते.

'प्रभात फिल्म कंपनी'तून बाहेर पडल्यानंतर बेडेकरांनीं कांहीं दिवस श्री. दादा तोरणे यांच्या 'सरस्वती सिनेटोन'मध्यें वास्तव्य केलें. तेथें त्यांचें न जुळल्यामुळें म्हणा, किंवा 'सरस्वती'च्या सान्निध्यांत 'लक्ष्मी'चा लाभ होणें कठीण आहे हें त्याना दिसून आल्यामुळें म्हणा— त्यांनीं तेथून लवकरच काढता पाय घेतला. याच वेळीं पुण्यांतील 'नवयुग चित्रपट लिमिटेड' या कंपनींतून बाबुराव पेंढारकर आणि पांडुरंगराव नाईक ही मंडळी बाहेर पडली होती आणि त्यांनीं 'न्यू हंस' या कंपनीची स्थापनाही केली होती. आपल्या गुणांचें येथें योग्य चीज होईल या आशेनें या कंपनींत विश्राम बेडेकरांनीं प्रवेश केला. 'न्यू हंस'नें काढलेला पहिलाच बोलपट 'पहिला पाळणा' बराच गाजला. याला बहुतांशीं बेडेकरच कारणीभूत होते असें माझ्या माहितीवरून मला म्हणायला कांहींच हरकत वाटत नाहीं. 'पहिला पाळणा' पाहतांना आपण बेडेकरांचेंच प्रतिचित्र तर पाहात नाहींना असा वारंवार भास होतो. हा बोलपट शंभर टक्के विनोदी होता. विनोदी बोलपट काढायचा असेल तर पहिल्या पाळण्याचाच आदर्श दुसऱ्या कोणत्याही विनोदी बोलपटापेक्षां ठेवावा हें मी एकवारच नव्हे तर अनेकदां म्हणेन. "भीक मागायची कशाला येते आहे पाळी! अग, या सातआठ मुलांत बसवून तुझा नुसता फोटो काढूं, आणि तें जिवतीचं चित्र म्हणून श्रावणांत विकूं म्हणजे हजारों रुपये मिळतील––" "अहो पेट्रोलचा अन् पोरांचा काय हो संबंध! मुलांना हंसायला– खेळायला– दुडदुड धांवायला काय पेट्रोल पाजावं लागतं!" पहिल्या पाळण्यांतील अशा प्रकारचे विनोदी संवाद

गडकऱ्यांच्या विनोदी संवादाच्या तोडीचे नाहींत असें म्हणणाऱ्याचें हंसेंच होईल ! पहिल्या पाळण्यांतील डेक्कन नॅशनल बँकेंतील—व मेजवानीच्या वेळचा विंचू-प्रसंग थिएटरांत हास्याचा पूर लोटवतात. ‘ सात मजली हंसणें ’ किंवा ‘ विनोदाचा प्रचंड धबधबा ’ ह्या म्हणी खऱ्या असल्याचें दुसऱ्या कोणत्याही विनोदी बोलपटापेक्षां याच बोलपटाच्या वेळीं प्रत्ययास येतें. बसस्टँडपासून बोलपटाला होणारी सुरवात—आणि मूल दार लावून आईवडिलाना आपल्याकडे बोलावतें हा बोलपटाचा होणारा आकर्षक शेवट कोठल्याही इंग्रजी बोलपटाच्या तोडीचा आहे असें मी स्पष्टपणें म्हणतों. विश्राम बेडेकराच्या दिग्दर्शन कौशल्यामुळेंच हा बोलपट लोकप्रिय झाला हें जाता जातां सांगणें मला आवश्यक वाटतें.

बेडेकर, ‘ ब्रह्मकुमारी ’ हें एकच नाटक लिहून आपण रंगभूमीकडे आपली विशाल पाठ कां फिरवली हें माझ्या अल्पबुद्धीला तरी आकलन होत नाहीं. चार वर्षांपूर्वी नाट्यदेवीनें रंगभूमीवर शेवटचा श्वास सोडण्याची शोचनीय पाळी आणली होती. नाकाशीं सूत धरायचेंच काय तें बाकी राहिलें होतें. पण याच वेळीं कै. लोंढ्यांच्या ‘ राजाराम संगीत मंडळीनें ’ आणि श्री. रांगणेकरांच्या ‘ नाट्यनिकेतन ’नें तिला नवचैतन्य प्राप्त करून दिलें. पण नाट्यदेवीला तिच्या पूर्वीच्या सिंहासनावर कोण बसवणार ? नाट्याचार्य कृष्णाजीपंत आतां वृद्ध झाल्यामुळें त्यांच्याकडे तर याचनाच करतां येत नाहीं. आपल्या विनोदी नाटकांनीं रंगभूमीला कांहीं काळ तगवून धरणाऱ्या अत्र्यांची सराइताप्रमाणें बोलपटाचें नाटकांत रूपांतर करण्याची हातचलाखी पाहून त्यांच्या हातून हें कार्य कितपत पार पडेल याची जबरदस्त शंका आहे. गोकुळांतल्या कन्हय्यावर (कन्हयालाल मुनशींवर नव्हे !) कींव येईपर्यंत कविता करणाऱ्या शुक्लांचा वाङ्मयरूपी शुक्लेंदु मावळत चाललेला पाहून त्यांच्याबद्दल आशा करणें म्हणजे रंगभूमीच्या पाठीमागें नसतेंच शुक्लकाष्ठ लावून दिल्यासारखें नाहीं का होणार ? म्हणून आपल्यासारख्याच खंद्या लेखकानीं नाट्यदेवीला तिचें पूर्वीचें वैभव प्राप्त करून देण्याची खटपट करावी असें आपल्याजवळ आमचें मागणें आहे. रंगभूमीची सवत असणाऱ्या बोलपटसृष्टीशीं जरी आपला संबंध घडून आला असला,

तरी वाङ्मयप्रांतांत आपण नाटककाराच्या रूपानेंच पाऊल टाकलें आहे हें आपल्याला विसरून चालणार नाहीं. दोन वर्षांपूर्वी सांगली येथें झालेल्या नाट्यशताब्दि महोत्सवाच्या प्रसंगीं आपण एकादें सामाजिक नाटक लिहून तेथेंच रंगभूमीवर आणाल अशी मला आशा होती, पण आपण ती पुरी केली नाहींत.

ब्रेडेकर, आपल्या लहरी स्वभावास अनुसरून आपण नाटकाप्रमाणेंच एकच कादंबरी लिहून कादंबरीशीं घटस्फोट केलात. आपल्या अंगीं असलेल्या कलेला आपण अशा तऱ्हेनें पार चिरडून टाकीत आहांत. लेखणीला कांहींहि न लिहितां तशीच ठेवली तर ती गंजते, हें तत्त्व आपणांस ठाऊक नाहीं असें मी कसें म्हणूं ! एकाच कलाकृतीनें कलावंत अजरामर होतो ही भ्रामक कल्पना तर आपल्या डोक्यांत डोकावत नाहीं ना ? शेक्सपिअरनें ' हॅम्लेट ' हें एकच नाटक लिहिलें असतें तरी त्याला जागतिक कीर्ति मिळाली असती असें म्हणणाऱ्या लोकाच्या धाष्ट्यांची मला कींव येते. शेक्सपिअरनें छत्तीस नाटकें लिहिलीं; पण हॅम्लेटनें त्याला जागतिक कीर्ति मिळवून दिली असें म्हणा पाहिजे तर ! जगाच्या अंतापर्यंत ज्याच्या वाङ्मयकृति चिरंजीव राहतील त्या कालिदासाला ' शाकुंतला 'नें अजरामर केलें असेंहि म्हणा हवें असेल तर ! पण फक्त शाकुंतलच लिहून कालिदास अमर झाला असता— आणि फक्त हॅम्लेटवरच शेक्सपिअरनें जागतिक लौकिक मिळवला असता असें म्हणणें असमंजसपणाचेंच ठरेल. ब्रेडेकर, तेव्हां एकच कादंबरी लिहून आपण कादंबरीला सोडचिठ्ठी देऊं नये. आपल्या कादंबऱ्या वाचायला आम्ही खरेंच उत्सुक आहोंत.

आपण आतां प्रभात कंपनी सोडून दुसरीकडे जायचें असेल तर पुनः शांतारामबापूंकडेच जा ! कीर्तिकडे डोळेझांक करून ' लक्ष्मीचे खेळ ' ब्रेडेकर कधींच खेळायचे नाहींत हें मला पक्कें ठाऊक आहे. पैशाच्या आशेनें हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागणाऱ्या नट-नटींची आणि त्याच-बरोबर दिग्दर्शकांची व लेखकाची स्थिति किती फजितीची झाली आहे, हें मीं ब्रेडेकरांना सांगावें असें नाहीं. ते आतां त्या धंद्यांतील एक आदमी असल्यामुळें त्यांना त्याची पुरेपूर कल्पना असेलच. पण हितशत्रूंना बळी

पडून स्वतःच्या प्रतिभेची वाताहात करणाऱ्या पतितांची शोकजनक कहाणी त्यांनीं अहोरात्र दृष्टीसमोर ठेवावी अशी माझी त्यांना स्नेहाची सूचना आहे.

मी कांहीं कुडबुड्या ज्योतिष्याप्रमाणें भोळ्या बायाबापड्यांना फसवून पोट भरणारा भविष्यवादी नाहीं—— किंवा भावी कालांत घडून येणाऱ्या घटनांबर-हुकुम आधींच रामायण लिहिणारा वाल्याही नाहीं. तर्कशुद्ध कसोटीवर घांसून पारखलेला एक सोन्यासारखा विचार माझ्या मनश्चक्षूंसमोर चमकत आहे. मराठी वाचकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडणारें- त्याच्या भावनांना हलवून सोडणारें वाङ्मय लिहिणारी अशी, आणि बोलपटसृष्टींत क्रांति करील अशी एकच व्यक्ति भावी काळांत आपल्या अंगच्या गुणांच्या तेजानें आपल्या नजरेसमोर चमकत असलेली आपल्याला दिसून येईल, ती व्यक्ति म्हणजेच वि-श्रा—म बे—डे—क—र !

---

## ३ : सौ. जोत्स्ना भोळे

दहा-अकरा वर्षें झालीं असतील ! १९३६ सालच असेल कदाचित् ! त्या दिवशीं दुपारीं श्री. वर्तक यांनीं लिहिलेल्या 'आंधळ्यांची शाळा' या नाटकाचा प्रयोग पुण्यांतील विजयानंद नाट्यगृहांत होणार होता. मीं आधीं दोन दिवस खुर्चीचें तिकिट रिझर्व्ह करून ठेवले असल्यामुळें नाटकाला वेळेपूर्वी पांचच मिनिटें गेलों असतों तरी चालण्यासारखें होतें. पण नाटकाला काय, सिनेमाला काय, किंवा जलशाला काय, आधीं अर्धा तास जाऊन बसण्याची तऱ्हेवाइक संवय मला लहानपणापासूनच जडली आहे. नाटक सुरू होणार होतें बरोबर चारला ! आणि मी थिएटरांत प्रवेश करतांच कोटाची डाव्या हाताची बाही किंचित् वर करून मनगटावरील घड्याळांत पाहिलें तो फक्त साडेतीनच वाजले होते. नाटक सुरू होण्याला तब्बल अर्धा तास होता !

श्री. केशवराव दाते, श्री. के. नारायण काळे, वसंत ठेंगडी आणि सौ. जोत्स्ना भोळे वगैरे सुशिक्षित कलावंत नाटकांत भूमिका करणार हें जाहीर झालें असल्यामुळें नाट्यगृहाला छोट्याशा जत्रेचें स्वरूप आलें होतें, असें मीं म्हटल्यास त्याची अतिशयोक्तींत गणना होईल असें मला तरी वाटत नाहीं.

मीं डोअरकीपरजवळ तिकिट दिलें आणि त्यानें बोटानें दाखवलेल्या खुर्चीवर जाऊन बसलों. माझ्या उजव्या हाताला पेशवाईत शोभतील असे एक वृद्ध गृहस्थ स्थानापन्न झालेले मला दिसले. आणि माझ्या डाव्या बाजूच्या दोन खुर्च्या एका नव्या जोडप्यानें अडविलेल्या होत्या. मी खुर्चीवर बसलों खरा, पण मला सारखें वाटत होतें कीं, एखाद्या वात्रट कॉलेज-विद्यार्थ्यानें 'नव्याजुन्याचा सुवर्णमध्य' असें माझ्याकडे पाहून म्हटलें नाहीं म्हणजे

मिळवली ! नाटकाला न्यायमूर्ति लोकूर, श्री. गोविंदराव टेंबे, दुर्गाबाई खोटे, मुबारक, केशवराव भोळे अशी बडीबडी मंडळी आली होती. इतक्यात पहिली घंटा झाली ! रिझर्व्ह केलेल्या खुर्च्यांवरील– पण इतका वेळ बाहेरच चेहेरे पाहात रेंगाळत असलेले–– प्रेक्षक आपआपल्या जागीं जाऊन बसले. प्रेक्षकात डेक्कन जिमखाना आणि पुण्यांतील ब्राह्मणी पेठा यांतील पांढरपेशांचाच भरणा जास्त होता. त्यातील तरुण-तरुणींच्या हातरुमालावरील सेंटचा उन्मादक वास चोहोंकडे दरवळत होता. दुसरी घंटा झाली ! ! माथीला असलेल्या वादनकारांच्या फिडलमधून निघणाऱ्या मधुर संगीतानें थिएटरात आल्हाददायक वातावरण निर्माण झालें. तिसरी घंटा झाली ! ! ! स्टेजसमोरच्या मोठ्या दिव्यांखेरीज बाकीचे सर्व दिवे मालवले गेले. आणि रंगभूमीवरील मखमालीचा पडदा बाजूला जाऊन नाटक सुरू झालें.

'आंधळ्याची शाळा' या नाटकांतील प्रमुख नायिकेची म्हणजेच 'बिंबा'ची भूमिका सौ. ज्योत्स्ना भोळे यानीं केली होती. केशवराव दात्यांसारख्या कैक वर्षे रंगभूमीवर कसलेल्या आणि आपल्या तडफदार भूमिकेनें रंगभूमी दणाणून सोडणाऱ्या नटश्रेष्ठाबरोबर भूमिका करण्याचें अवघड काम ज्योत्स्नाबाईंनी इतक्या तन्मयतेनें आणि सहज केलें कीं, रंगभूमीवर स्त्रियांचीं कामें स्त्रियांनींच करावींत; ज्याचें पोट उपड्या घागरीप्रमाणें किंवा तंबोऱ्याच्या भोपळ्याप्रमाणें पुढें आलेलें आहे अशा पुरुष नटांनीं करूं नयेत, हें माझें मत निश्चित झालें; आणि त्या वेळेला लिहिलेल्या एका लेखांत माझें हें मत मीं प्रतिपादितहि केलें आहे.

"कुलीन स्त्रियानीं रंगभूमीवर येणें अवश्य आणि अपरिहार्य आहे" ही जाहीर घोषणा प्रथम श्री. गोविंदराव टेंबे यांनींच १९२६ मध्यें केली. त्यांचें हें म्हणणें सत्यसृष्टींत उतरविणाऱ्या दोन नाटक कंपन्या लौकरच निघाल्या. गानकोकिळा सौ. हिराबाई बडोदेकर व त्यांची बहीण कमलाबाई बडोदेकर यांनीं काढलेली 'नूतन संगीत नाटक मंडळी' ही कंपनी पहिली. आणि श्री. केशवराव दाते यांच्या खटपटीनें स्थापन झालेली सुशिक्षित कलावंतांची 'नाट्यमन्वंतर' ही दुसरी कंपनी होय.

'नाट्यमन्वंतर'च्या 'आंधळ्याची शाळा' या नाटकांत इतर सुशिक्षित नटनटींबरोबर जेव्हां ज्योत्स्नाबाईनीं काम केलें, आणि आपल्या आत्मीयतेनें केलेल्या भूमिकेनें आणि मधुर कंठांतून निघालेल्या भावगीतांनीं जेव्हां त्यांनीं प्रेक्षकांच्या हृदयाचा ठाव घेतला, तेव्हां जुन्या रंगभूमीवरील बुद्रुक आणि पेनसर्णींत निघालेल्या नटांनीं आणि सदैव जुन्याचेच गोडवे गाणाऱ्या कांहीं संगीतचिवडामणींनीं भयंकर आकांडतांडव केलें. आणि असे उद्गार काढले कीं, "हॅं ऽऽ! बायका काय रंगभूमीवर काम करूं लागल्या! दहा-दहा मिनिटें गातात काय! गाणं कीं रडगाणं!" त्यांचे हे कुत्सित उद्गार ऐकून 'मार्जा रोलभते न पंजरशुकालापेन कौतूहलं' या संस्कृत वचनाची मला आठवण झाली. मला असें सांगायचेंय् कीं रंगभूमीवर स्त्रियाच स्त्री-भूमिका करूं लागल्या म्हणून रंगभूमी कांहीं वर्षे जगली तरी! अन् ललिता परूळकर, मंगला रानडे यांच्या भूमिका हल्लीं पाहिल्या म्हणजे रंगभूमीचा पुन्हां उद्धार होण्याची वेळ आली आहे, हें त्या बुद्रुक नटांना आणि संगीतचिवडामणींना माहीत नसावें याची मला कींव येते.

ज्योत्स्नाबाईसारख्या सुशिक्षित नटी रंगभूमीवर पदार्पण करूं लागल्या आणि म्हणूनच उच्च प्रकारचा अभिनय पाहण्याची संधि तरी आपल्याला मिळाली. स्त्रियांना सहा सहा तास किंवा उजाडेपर्यंत चालणाऱ्या नाटकांत काम करणें जमणार नाहीं, थोडेंसें अवघडच जाईल, म्हणून दोन–तीन तास चालतील अशी 'बेबी', 'आंधळ्याची शाळा', 'सदा बंदिवान्' यांसारखीं नाटकें लिहिलीं गेलीं. त्याचप्रमाणें नाटकाच्या पावलावर 'पाऊल' टाकून 'पदांतहि' पालट होणें आवश्यक होतें. कोणत्याहि कलेंत नावीन्य हें कालांतरानें क्रमप्राप्तच आहे. आणि नावीन्याखेरीज ती कला सर्वांगीण होतच नाहीं. कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचीं नाटकें जेव्हां रंगभूमीवर आलीं तेव्हां ठसकेबाज लावण्या म्हटल्या जात असत. कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या नाटकांतील पदांना पार्शी पद्धतीच्या चाली दिल्या होत्या., आणि खाडिलकर–गडकऱ्यांच्या वेळेस गायकी वळणाच्या चालींनीं रंग-भूमि दणाणून गेली. त्या त्या कालानुसार तशा पद्धतींचें संगीत लोकप्रियही झालें. पण त्यानंतर बोलपटांतील गाण्यांची छाप रंगभूमीवर पडूं लागली,

आणि भावनात्मक गीतांचा उदय झाला. भावगीत हा संगीतांतील नवीन प्रकार न आवडणारे कांहीं लोक आहेत. भावनेला जाऊन भिडणारा रसपरिपोष भावगीतांनीं निर्माण होत असतांना ह्या संगीत प्रकाराला संगीततज्ज्ञांनीं अनिष्ट आणि कनिष्ठ कां समजावें हें मला तरी कळत नाहीं. गळ्याची 'आ' वासून कसरत,-- तानांच्या माकडगिरक्या— आणि कोलांट्या उड्या यांनाच केवळ उच्च संगीत म्हणण्याचे दिवस जुन्या रंगभूमीबरोबरच संपून गेले आहेत अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

'आंधळ्याची शाळा' या नाटकातील 'आला खुषींत समिंदर' 'तूं माझी अन् तुझा मीच' हीं ज्योत्स्नाबाईंनीं गायलेलीं दोन भावगीतें ऐकून बरेच दिवस लोटले होते. त्याचें गाणें ऐकण्यास न मिळाल्यामुळें माझी स्थिति

" I pant for the music which is divine
My heart in its thirst is a dying flower "

असें म्हणणाऱ्या 'शेले'सारखी झाली होती. पण पुनः त्यांचें गाणें ऐकण्याचा योग मला आला. पुण्याच्या जॉली क्लबमध्यें त्यांच्या बैठकीचा कार्यक्रम होता. ज्योत्स्नाबाईंनीं तीन चार भावगीतांनंतर एक अशी चीज गायली कीं 'वाहवा !' 'वाहवा !' असे उद्गार साहजिकपणेंच श्रोत्यांच्या तोंडून बाहेर पडले. मला वाटतें जयजयवंती रागातीलच ती चीज होती. गोंड गळयांतून निघणाऱ्या मधुर आलापांचें संगीत ऐकणाऱ्याची स्थिति मादक पेयाचें प्राशन करून बेहोष झालेल्या किंवा तरुणींच्या सहवासानें धुंद झालेल्या इसमाच्या स्थितीसारखीच होते.

'यंग इंडिया' या 'रेकॉर्ड कंपनीनें' ध्वनिमुद्रित केलेल्या ज्योत्स्नाबाईंच्या सर्वच रेकॉर्डस् अल्पावधींत लोकप्रिय झाल्या. 'दिन मावळला'— ही रेकॉर्ड तर घराघरांतून अद्यापही ऐकूं येते.

ज्योत्स्नाबाईंना नाटकात पुनः भूमिका दिल्यास त्या कंपनीला अलोट पैसा मिळवून देतील याच आग्र हेतूनें श्री. मोतीराम रांगणेकरानीं 'नाट्यनिकेतन' ही कंपनी स्थापली. त्या कंपनीच्या, रांगणेकरांनीं लिहिलेल्या 'आशीर्वाद' या पहिल्याच नाटकांत ज्योत्स्नाबाईंनीं भूमिका केली आहे. "तात्यासाहेबांनीं आपल्याला एवढें उच्च शिक्षण किती क्लेश काढून दिलें

याची जाणीव झाल्यावर जी आपल्या हृदयाचे तुकडे तुकडे करायला तयार झाली, " त्या सुमित्रेची ज्योत्स्नाबाईंनीं केलेली भूमिका माझ्या कायम लक्षांत राहील. रांगणेकरांच्या ' कुलवधू ' या पुढच्याच नाटकाइतकें हेंही नाटक गाजलें असतें. पण या नाटकांतील चाली लोकप्रिय होतील अशा बांधल्या गेल्या नाहींत. म्हणूनच केवळ हें नाटक धनयोगदृष्ट्या कमी लाभदायक ठरलें असें मी म्हणेन. तरीही ज्योत्स्नाबाईंनीं ' हांसते मनीं डोलते ' या आपल्या पातळ आवाजात म्हटलेल्या पदानें प्रेक्षक तल्लीन होऊन मनापासून डोलताना मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे.

त्यानंतर ' नाट्य-निकेतन 'च्याच ' कुलवधू ' या ' स्वयंवर ' इतकें ' रेकॉर्ड ब्रेक ' ठरलेल्या नाटकाला मी माझ्याकडे आलेल्या एका हैद्राबादी दोस्ताबरोबर गेलों होतों. ' भानुमती ' या नटीची ज्योत्स्नाबाईंनीं केलेली भूमिका कुलीन अन् स्वाभिमानी नटीच्या आयुष्यांतील जीवनाचें प्रतिबिंबच ठरेल यांत यत्किंचितही शंका नाहीं. पहिल्या अंकांतील प्रवेशापासून तों नाटकांतील शेवटच्या भैरवीपर्यंत ज्योत्स्नाबाई इतकें मन लावून काम करतात कीं, हेंच काम पाहण्यासाठीं या नाटकाला वीस वीस वेळां गेलेले प्रेक्षक मला ठाऊक आहेत. त्या गात असलेली ' बोला अमृत बोला ' ही भैरवी जेव्हां संपली, तेव्हां टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. माझा दोस्तहि ' वन्समोअर ' म्हणून जोरांत ओरडला. नाटक संपल्यावर आम्ही थिएटरमधून बाहेर पडलों. तरीही माझ्या कानांत त्या अमृतासारख्या अवीट भैरवीचे स्वर घुमत होते. माझा दोस्त तर मला म्हणाला— " वा गोविंदराव ! बाईनें तो आज कमाल करदी ! बालगंधर्व के भैरवीके बाद इतनी लाजवाब भैरवी हमने आजही सुनी ! " माझ्या दोस्ताचे हे उद्गार खरे नाहींत असें कोण म्हणेल ! ही भैरवी ऐकण्यास लोटणारी अफाट गर्दी पाहून ' मृच्छकटिक ' नाटकांतील बालगंधर्वांचें " माडीवरि चल ग गडे " हें गाणें ऐकण्यास येणाऱ्या तोबा गर्दीची मला साहजिकच आठवण झाली. मास्तर कृष्णराव यांनीं बांधलेली चाल—— भैरवीसारखी सर्वच सुरांची रागिणी आणि त्यांतून गाणाऱ्या गोड गळ्याच्या ज्योत्स्नाबाई, इतका त्रिवेणीसंगम फारच क्वचित् वेळां येतो. मास्तर कृष्णांना कल्पना नसेल इतकी ती भैरवी ज्योत्स्नाबाईंनीं सफाईदार गायली

आहे. शातारामबापूंचें दिग्दर्शन-कौशल्य पाहातांना जशी बुद्धीला चालना मिळते तशीच, पण जिचा भावनेशीं संबंध आहे अशी चालना, ज्योत्स्नाबाईंच्या भावगीतानीं दिली जाते.

यानंतर ज्योत्स्नाबाईंनीं 'नाट्यनिकेतन' च्याच रंगभूमीवर आणि श्री. रांगणेकरानींच लिहिलेल्या 'अलंकार' या नाटकात मुख्य नायिकेची म्हणजेच 'वत्सलेची' भूमिका केली. रांगणेकरांचें हें नाटक अगदींच साधारण होते. आणि हें नाटक जें काहीं दिवस तग धरून राहिले तेंही केवळ ज्योत्स्नाबाईनीं त्यात भूमिका केल्यामुळेंच !

गंधर्व नाटक कंपनीतील एका माजी नटानें ज्योत्स्नाबाईंनीं भूमिका केलेली नाटकें पाहून माझ्याजवळ असे उद्‌गार काढले कीं, "ही बाई या नाटकातून आपली भूमिका कशा प्रकारची आहे हें समजून घेऊन अभिनय करते. हिचा आवाजही मधुर, पातळ आणि भावगीताला साजून दिसेल असाच आहे. तरी पण सहा-सहा तास चालणाऱ्या जुन्या नाटकाप्रमाणे जर एकाद्या लेखकानें नाटक लिहिलें तर, त्यांत या बाईला भूमिका करणें कितपत झेपेल याची मला शंकाच आहे !" माझ्या स्नेह्याच्या या कल्पना-साम्राज्याला ज्योत्स्नाबाई तरी खासच कोलमडून पाडतील यात मला बिलकूल शंका वाटत नाहीं. ज्योत्स्नाबाईंनीं आपण तीन-साडेतीन तास चालणाऱ्या नाटकात न दमता काम करून दाखवितों हें सिद्धच केलें आहे. आणि माझ्या स्नेह्याच्या विधानाला खोडून काढण्यासाठीं मला श्री. रांगणेकराना एक सूचना करावयाची आहे. रांगणेकरानीं आजवर लिहिलेलीं सर्व नाटकें पाहतां ते नव्या जमान्यांतील एकमेव यशस्वी नाटककार आहेत असें म्हणणें खास धाष्ट्यांचें ठरणार नाहीं. त्यानीं सहा तास चालेल असें एक नाटक लिहावे, ज्योत्स्नाबाईंना त्यांत भूमिका द्यावी व स्त्रियाना सहा सहा तास चालणाऱ्या नाटकात काम करणें जमणार नाहीं, असें म्हणणाऱ्या टीकाकारांचीं तोंडें क़ायमचीं बंद करावींत. ज्योत्स्नाबाई, आपल्याबद्दल मीं बांधलेल्या अपेक्षेतील ही पहिली आहे.

मी माझ्या 'व्यक्ति आणि अपेक्षा' या लेखमालेंत तिसरा लेख 'सौ. ज्योत्स्ना भोळे' यांच्यावर लिहायचें ठरवलें तेव्हां पुण्यातील माझे मित्र

असलेल्या व संगीतावर अधिकारवाणीनें बोलूं शकतील अशा संगीतज्ञाकडे गेलों. " आहेत का बुवा ? " मीं बाहेरूनच विचारलें.

तों स्वतः बुवाच बाहेर आले; आणि आपल्या तोंडांतील पानाचा तोबरा उजव्या हातांत घेऊन रस्त्यावर फेंकीत म्हणाले——

" आइये— आइये महाराज. आइये ! आबकी तबियत तो ठीक है ना ? "

असें म्हणत त्यांनीं मला, माझा हात धरून आपल्या दिवाणखान्यांत नेलें. लवकर सुटका करून घेण्याकरितां माझ्या येण्याचा आशय त्यांना सांगून मीं विचारलें.

" ज्योत्स्नाबाईच्या गाण्याबद्दल तुमचें काय मत आहे बुवा ? फक्त गाण्याबद्दल हं. "

माझ्या प्रश्नाला एकवार हंसत आणि तोंडातील पानाचा तोबरा या वेळीं मात्र शेजारच्या निकदाणींत थुंकत ते म्हणाले—

" सुनना है—— तो सुनो ! "

ज्योत्स्नाबाईच्या गाण्याबद्दल बुवांनीं मला बरेंच ऐकवलें ! त्यांनीं एक असा स्पष्ट आरोप केल्याचें मला स्मरतें कीं, ज्योत्स्नाबाईना बैठकीचें गाणें जुळणार नाहीं. त्यानीं आजवर बैठकी केल्या असल्या किंवा इतर गायिकां-प्रमाणें त्यांच्या आवाजात ' नखरा ' असला तरी, सौ. हिराबाई बडोदेकर, आझमबाई, किंवा सुंदराबाई यांच्याप्रमाणें बैठक गाजवण्याची त्यांच्यांत कुवत नाहीं. चार पांच भावगीतें म्हणून, आणि गोविंदराव जोशांप्रमाणें पदांतील तेच तेच चरण पुनः पुनः घोटून त्या वेळ काढतील.

ज्योत्स्नाबाईच्या गाण्याबद्दल टीका करणाऱ्यांना माझा असा स्पष्ट सवाल आहे कीं, नाटकी गायकांकडून तुम्ही उस्तादी चिजा अपेक्षित करतां का ? आणि यापुढेंहि जाऊन मी असें म्हणतों कीं ज्यांनीं आजकाल ज्योत्स्नाबाईचीं रेडिओवरील गाणीं ऐकलीं असतील, आणि ज्यांनीं ज्योत्स्नाबाईच्या आज-कालच्या बैठकी ऐकल्या असतील, त्यांना कळून येईल कीं, ज्योत्स्नाबाईनीं या उच्च संगीतांतसुद्धां किती आघाडी मारली आहे.

बोलपट सृष्टींत प्रवेश करायचा म्हटलें तर नटीला तीन गुण आवश्यक आहेत. आणि म्हटलें तर ते नसतील तरी चालतें. पहिला गुण म्हणजे सौंदर्य ! हा गुण आजकाल रुपेरी पडद्यावर चमकणाऱ्या बसक्या नाकाच्या आणि उभट चेहऱ्याच्या पोरी पाहून आवश्यक नसावा असें वाटतें, पण हा गुण ज्योत्स्नाबाईंच्यामध्यें भरपूर आहे. मी त्यांना अनेकवार पाहिलें आहे म्हणून, व मी जी सौंदर्याची व्याख्या करतों त्याला धरून हें मी म्हणतों. दुसरा गुण ' अभिनय ! ' सिनेमाकंपनीच्या मालकाच्या मर्जीतील मुलीला हा गुण नसला तरी चालतो. ज्योत्स्नाबाईंच्या नाटकांतील भूमिका पाहून ह्याही गुणांनीं त्या युक्त आहेत असें म्हणणें खास चुकीचें ठरणार नाहीं. तिसरा गुण गोड गळा ! प्लेबॅक म्युझिकची पद्धत आचरणांत येऊं लागल्यापासून नटीला गोड गळा असलाच पाहिजे असा नियम नाहीं. ज्योत्स्नाबाईंच्या गोड आवाजाबद्दल मीं लिहिणें म्हणजे प्रो. फडके हे चांगले कादंबरीकार आहेत, असें एका कुमार साहित्यिकानें म्हटल्याप्रमाणें होईल. ज्योत्स्नाबाई-जवळ हे तीनहि गुण असतांना त्यांनीं यापूर्वींच बोलपट सृष्टींत का प्रवेश केला नांहीं हें त्यांच्या असंख्य चाहत्याना एक कोडेंच होतें. बऱ्याच वर्षां-पूर्वीं त्यानीं ' संत सखूबाई ' या पौराणिक बोलपटांत भूमिका केली आहे. आतां त्यांना मुख्य भूमिका देऊन श्री. रांगणेकर हे ' कुबेर ' नांवाचा मराठी बोलपट काढीत आहेत. ज्योत्स्नाबाई, बोलपट सृष्टींत प्रवेश केल्यानंतर महाराष्ट्रात गाइलें जाणारें आपलें गुणगान अखिल हिंदुस्थानला आपण गायला लावाल अशी मला आशा आहे.

' वर्डस्वर्थ 'नें आपल्या ' The Solitary Reaper ' या कवितेंत म्हटलें आहे.

The music in my heart I bore
Long after it was heard no more.

या ओळींत थोडासा बदल करून ज्योत्स्नाबाईंच्या गाण्याबद्दल मी म्हणेन--

The music in my heart I bore
I like to hear it more and more.

## ४ : श्री. शामराव ओक !

सहा वर्षांपूर्वीची गोष्ट ! पुण्यातील नवोदित लेखकाचें एक मंडळ स्थापावें आणि सदर मंडळाला 'पुरोगामी वाङ्मय मंडळ' असें नांव द्यावें असें आम्हीं दोन तीन लेखक-मित्रांनीं ठरवलें. त्याप्रमाणें मंडळाची स्थापना झाली. मंडळांतील बहुसंख्य सभासदांना तपकिरीचें व्यसन दांडगें असल्यामुळें, मंडळाची कचेरी तपकीर गल्लींतच असावी असेंहि ठरलें. आज तें मंडळ अस्तित्वांत नाहीं याला बरींच कारणें आहेत. मंडळाच्या स्थापनेनंतर बरोबर एक वर्षानें मंडळांतील लेखकाच्या सामुदायिक लेखाचा एक संग्रह प्रकाशक गाठून प्रकाशित करावा अशा बऱ्याच सभासदाकडून सूचना आल्यामुळें तें अवघड आणि जिकीरीचें काम मीं शिरावर घेतलें ! संग्रहांतील सर्वच लेखक उदयोन्मुख असल्यामुळें आणि वाङ्मयप्रांतांतील मुशाफरीला त्यांनीं नुक्तीच सुरवात केली असल्यामुळें प्रस्तुत संग्रहाला 'नवे मुशाफीर' असें नांव द्यायचें बहुमतानें ठरलें. संग्रह प्रसिद्ध होण्याच्या शेवटच्या 'फार्मांत' असतांना संग्रहाला एखाद्या प्रसिद्ध लेखिकेची प्रस्तावना घेण्याचा स्टंट करण्यासाठीं मी 'अनिरुद्ध प्रवाह' या पुस्तकाच्या लेखिका मुक्ताबाई दीक्षित यांच्याकडे पत्रद्वारें तशी विनंती केली. परंतु कार्यबाहुल्यामुळें त्यांना वेळ नसल्याचें त्यांनीं कळवलें. यानंतर मी श्रीमती शकुंतलाबाई परांजपे यांच्याकडे विचारणा केली. हेतु हा कीं ह्या तरी आम्हां पुणेकर लेखकांची सोय पाहातील ! परंतु त्यांनींही नन्नाचा पाढाच ऐकवला. आतां स्त्रियांच्या वाटेला जायलाच नको असें नक्की ठरवून महाराष्ट्रांतील एक नामवंत विनोदी लेखक श्री. शामराव नीलकंठ ओक यांचीच प्रस्तावना घेण्याचा विचार मीं मुक्रर केला. आणि एके दिवशीं

त्यांच्याकडे गेलों. भेटीस येण्याचा आशय त्यांना निवेदन करतांच ते म्हणाले–" तुमच्यासारख्या नवोदित लेखकाच्या संग्रहाला म्हणजेच मुशाफराना मार्गदर्शन करण्याचं काम एकाद्या बड्या साहित्यिकाला सांगा कीं ! तुमच्या मंडळाच्या पहिल्यानंच प्रसूत व्हावयाच्या वाङ्मयापत्याचं बाळंतपण वास्तविक एकाद्या डॉक्टरेटची पदवी मिळालेल्या साहित्यमजकुराकडून झालं तर बरं दिसेल !" शामरावाच्या या उद्‌गारानीं निराश न होतां मीं अधिक गळ घालताच प्रस्तावना लिहून देण्यास ते तयार झाले आणि तीन दिवसांत त्यांनीं उत्कृष्ट प्रस्तावना लिहून दिली. शामरावाशीं माझी झालेली ही पहिलीच भेट !

दुसऱ्या भेटीचा प्रसंग एका निराळ्याच घटनेमुळें घडून आला ! १९४२ च्या नाताळांत मी माझ्या विजापूरच्या तीन स्नेह्यांबरोबर मुंबईस चाललों होतों. माझे ते स्नेही विजापुरास प्रसिद्ध सराफ आहेत. सोनें आणि चांदी मुंबईच्या सरकारी मिंटमध्यें आटवून ती विकण्यासाठीं ते मुंबईस चालले होते. शामराव ओकांच्या मिसेसही आमची सोबत मिळाल्यामुळें विजापुराहून मुंबईस चालल्या होत्या. शामरावांना, दादर स्टेशनवर उतरवून घेण्यास येण्यासाठीं त्यानीं तारही केली होती. परंतु शामराव दादर स्टेशनवर न आल्यामुळें त्या आमच्याच बरोबर पुढें आल्या. आम्ही सर्व बोरीबंदर स्टेशनवर उतरलों. माझ्या स्नेह्यांजवळ सोन्याचांदीनें भरलेल्या वीस बॅग्ज होत्या. दहा हमालांनीं त्या फलाटाबाहेर नेऊन तीन व्हिक्टोरियांत ठेवल्या. त्यानंतर आम्ही व्हिक्टोरियांतून मिंटकडे जाऊं लागलों. मिंटच्या फाटकांतून आंत प्रवेश करतों न करतों तोंच !– शामरावांच्या मिसेस ज्या गाडींत बसल्या होत्या ती गाडी उलटली ! आणि दैवानें खैर केली म्हणूनच–आणि शामरावांच्या मिसेसनीं एकदम उडी टाकल्यामुळें—घडून यावयाचा भयंकर अपघात होण्याचा टळला ! दोन दिवसांनीं शामराव ओकांची आम्हीं प्रत्यक्ष भेट घेतली तेव्हां– " हं ! सिल्व्हर ॲक्सिडंट काय म्हणतोय् ?" असें प्रथम मला विचारूनच त्यांनीं गप्पा मारण्यास सुरवात केली. शामरावांशीं माझी झालेली ही दुसरी भेट ! !

अगदीं घरगुती असे हे दोन प्रसंग सांगण्याचें कारण इतकेंच कीं, शामराव ओक जीवनाकडे कोणत्या दृष्टिकोनांतून पाहतात हें आपल्याला दाखवणें! पहिल्या भेटींत शामरावाचा विनोदी स्वभाव मला आढळला; आणि दुसऱ्या भेटींत जीवनाकडे पाहाण्याची त्यांची बेफिकीर वृत्ति माझ्या निदर्शनास आली. म्हणजे मला असें म्हणायचें नाहीं कीं त्यांच्या अंगीं ताठरपणा आहे. मला एवढेंच सांगायचें आहे कीं, घडून येणाऱ्या कोणत्याही प्रसंगाची ते फिकीर करीत नाहींत, काय होईल आणि काय होणार नाहीं याचाच विचार करीत ते बसत नाहींत. त्या त्या प्रसंगाला ते तितकेंच महत्त्व देतात. ही त्यांची वृत्ति त्यांचा प्रकृतिधर्म बनलेली आहे. आजपर्यंत त्यांनीं किती नोकऱ्या धरल्या आणि किती सोडल्या हें मीं सांगतांच माझें म्हणणें पटेल तुम्हांला. शामराव ओक आज अमुक ठिकाणीं नोकरीस आहेत आणि त्यानंतरच्या आठवड्यांत ते तेथें नाहींत हें ऐकून मला कांहींच नवल वाटणार नाहीं. आश्चर्य वाटेल तें अशा वेळीं कीं, शामराव ओक एकाच ठिकाणीं महिनाभर नोकरीस आहेत हें ऐकून! आजपर्यंत त्यांनीं इतक्या ठिकाणीं आणि इतक्या प्रकारच्या नोकऱ्या केल्या आहेत, कीं एवढ्या वयांत इतक्या ठिकाणीं आणि इतक्या प्रकारच्या नोकऱ्या करण्याचा विक्रम मला नाहीं वाटत दुसऱ्या कोणींही साहित्यिकानें केला असेल म्हणून! शामरावांच्या पायावर विधात्यानें चक्र निर्माण केलें असावें अशी माझी तरी समजूत आहे.

शामराव ओकांचा जन्म १९०७ सालीं झाला. आणि त्यांचे वडील पुण्यासच शिक्षक असल्याकारणानें शामरावांचें शिक्षणहि पुण्यासच झालें. वयाच्या सोळाव्या वर्षी मॅट्रिक होणारा विद्यार्थी सांपडणें महाकठीण! परंतु शामराव सोळाव्या वर्षीच मॅट्रिकची परिक्षा उत्तीर्ण झाले. आणि त्यांच्या इतमामास साजेल अशा डेक्कन कॉलेजांत त्यांनीं इंटरपर्यंत अभ्यासक्रम पुरा केला. आणि त्यानंतर मुंबईच्या सिडेनहॅम कॉलेजमधून ते बी. कॉम्. झाले. कॉलेजांत असतांना ते क्रिकेट-हॉकी—टेनिस वगैरे खेळांत मोठ्या उत्साहानें भाग घेत असत. त्याचेंच पुरेपूर प्रत्यंतर त्यांच्या आजच्या खेळाडू वृत्तींत दिसून येतें. त्यांचें पाळण्यांतलें नांव शांताराम असतांना त्यांनीं शांताराम हें

नांव टाकून शामराव हें नांव धारण केलें. आणि याच नांवानें त्यांनीं लेखकाच्या जीवनास आरंभ केला.

शामरावांना प्रथम नोकरी लागली ती मुंबईच्या प्रॉव्हिन्शिअल को.बँकेंत उमेदवार म्हणून ! बँकेंतील 'ठेवींची' मोजदाद करण्याचा त्यांना लौकरच कंटाळा आला म्हणा, किंवा घरचें खाऊन दुसऱ्याच्या उठा'ठेवी' करण्याचा त्यांचा स्वभाव नसल्यामुळें म्हणा, त्यांनीं तेथून काढता पाय घेतला. आणि ते एकदम गेले ते बडोद्याच्या 'सेन्सस ऑफिस' मध्यें ! लोकांना 'मोजण्यांचा' त्यांनीं तेथेंच श्रीगणेशा केला असावा असें मला वाटतें ! वर्षभर मोजलेल्या लोकसंख्येच्या मानानें पगाराची संख्या वाढत नाहीं हें दिसून येतांच ते बाहेर पडले; आणि पैसा-फंडाच्या ज्युबिली कमिटीचे सेक्रेटरी बनले. आणि येथेंच त्यांनीं कांचेच्या धंद्याचा इतिहास लिहिला. येथेंच त्यांनीं 'कांचेच्या घरांत राहून दुसऱ्यावर दगडफेंक करणाऱ्यांना' कोपरखळ्या देण्याचें शिक्षण घेतलें असावें ! यानंतर त्यांनीं 'महाराष्ट्र सिनेटोन'मध्यें कसेंबसें एक वर्ष काढून कोल्हापूर गांठलें. आणि 'हंस पिक्चर्स'मध्यें जनरल मॅनेजरची जागा पटकावली. ही जागा मिळण्यास त्यांना 'प्रतिभेंतील' सिनेमाविषयक स्फुटांचा वशिला मिळाला असावा. यावेळीं मला वाटलें, येथें ते स्थायिक होतील. परंतु त्याच्या पुढच्याच वर्षी मुंबईस मी ओरिएंट हायस्कूलच्या एका वर्गावर त्यांना भूगोल शिकवतांना प्रत्यक्ष पाहिलें. हेडमास्तराच्या हाताखालीं शामरावांसारखा करारी माणूस टिकणें शक्य नाहीं ही माझी खात्री होती. आणि तो माझा कयास खरा ठरला. शामरावांनीं मास्तरची नोकरी सोडून बी. पी. सामंत आणि कं. त ते जाहिरात-जनार्दन बनले ! इथेंही कुठेंतरी माशी शिंकली, आणि पृथ्वी वाटोळी आहे हें खरें करून दाखवण्यासाठीं ते परत पुण्यास आले. 'शिक्षण प्रसारक मंडळी'च्या कॉमर्स स्कूलमध्यें ते इंग्रजीचे अध्यापक झाले. लवकरच तीही नोकरी सोडून खडकी फॅक्टरींत त्यांनीं सुपरवायझरची जागा पत्करली. आणि आश्चर्य हें कीं 'आपली आवडती मुंबई बरी !' या हेतूनें त्यांनीं याही नोकरीला रामराम ठोकून मुंबई गांठली. सध्यां ते मुंबईस आहेत असें ऐकतों.

शामराव, अशा तऱ्हेनें एक नोकरी सोडून जरी आपल्याला दुसरी नोकरी लागलीच मिळत असली, तरी आयुष्याला स्थिरता आल्याशिवाय माणसाची प्रगति होत नाहीं हें आपल्याला माहीत नसावें असें मला वाटतें. अशा तऱ्हेनें बेफिकिरीनें वागण्यांत आपल्या अंगचें धाडस आणि आपली करारी वृत्ति जरी दिसत असली, तरी त्यामुळें माणसाचें पुष्कळदां नुकसान होतें, असें माझें तरी मत आहे. कोणाही कलावंतानें एकाद्या ठिकाणीं चिकटून राहण्यांतच त्याचा उत्कर्ष सामावलेला असतो असें नाहीं का आपल्याला वाटत ! बोलपटसृष्टींतील असेच गुणी नट वाटेल त्या कंपनीच्या बोलपटांत भूमिका केल्यामुळें वायां गेले आहेत, हें माझ्यापेक्षां आपल्याला अधिक अवगत आहे. वाङ्मय-प्रांतांतसुद्धां अशा तऱ्हेनें वागणाऱ्याचीं उदाहरणें हवीं तेवढीं दाखवितां येतील. आज जर आपण एकाच ठिकाणीं नोकरीस असता तर आपला भाग्योदय यापूर्वीच झाला असता आणि विनोदी वाङ्मयाच्या आघाडीवरील सेनापति असा आम्हीं तुमचा गौरव केला असता. माझी खात्री आहे कीं, तुमचें धोरण जरा खेळीमेळीनें घ्यावयाचें असें असतें तर कोठल्याहि सिनेमाकंपनीनें आपले चार-दोन विनोदी बोलपट आतांपर्यंत खासच काढले असते. आपण विचार केला तर मला वाटतें माझें म्हणणें पटेल आपल्याला ! आपलें आसन स्थिर असावें हीच आपल्याबद्दलची माझी पहिली अपेक्षा आहे.

'नाटकांत अगर सर्कशींत विशेष महत्त्वाचीं कामें करणाऱ्या विदूषकाचें जें स्थान तेंच साहित्यांत विनोदी लेखकाचें होय.' या आपल्यासकट सर्व विनोदी लेखकांसंबंधीं दिलेल्या श्रीयुत चिंतोपंत जोशाच्या निर्वाळयाशीं मी पूर्ण सहमत आहें. मालाकार चिपळूणकर हे विनोदी वाङ्मयाचे प्रवर्तक होत असें मी तरी समजतों. उपरोधाच्या धारेनें युक्त असें शस्त्र मालाकारांनीं आपल्या निबंधमालेंतून न्या. रानडे, अण्णा मोरेश्वर कुंटे, ज्योतिबा फुले यांचेवर चालविलें आणि त्यामुळें कांहींकाल तरी त्या व्यक्ति घायाळ झाल्या असाव्यात. मालाकारांनंतर कै. श्री. हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या कादंबरी—वाङ्मयांतून अनेक विनोदी पात्रें निर्माण केलीं. त्यांतील प्रो. डॅण्डीला कोण बरें विसरेल ! कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं

'वीरतनय' आणि 'मूकनायक' या नाटकांतून ज्याप्रमाणें विनोदी वातावरण कायम ठेवलें आहे, अगदीं त्याचप्रमाणें कै. गडकऱ्यांनीं 'भावबंधन' आणि 'प्रेमसंन्यास' या नाटकांतून विनोदाचा पूर वाहवून दिला आहे. श्री. माधवराव जोशी यांचीं तर सर्वच नाटकें विनोदी आहेत आणि अत्र्यांच्या विनोदाच्या धबधब्यानें मराठी वाचकवर्ग फार भिजून गेला आहे. श्री. न. चिं. केळकर यांचें बरेंचसें लिखाण हास्यरसाच्या मुशींतून ओतलेलें असतें. कॅ. लिमये हे तर आधुनिक विनोदी लेखकांचे आघाडीवरचे वीर आहेत. चिंतोपंत जोशांच्या 'चिमणरावाला'—ना. धों. ताम्हनकर यांच्या 'तात्या'ला— वि. मा. दी. पटवर्धनांच्या 'जीवाला' कोण बरें विसरेल ? विनोदी वृत्तपत्र-सृष्टीचा 'संदेश' कै. अच्युतराव कोल्हटकरांनीं घरोघर पोंचविला. त्यांचेच शिष्य म्हणून मो. ग. रांगणेकर, चं. वि. बावडेकर, दत्तु बांदेकर यांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. वर दिलेल्या विनोदी लेखकांच्या मालिकेंत आपले शामराव ओकसुद्धां सामावतात हें काय सांगायला पाहिजे ?

आचार्य अत्रे विनोद करतांना बरेच वेळां गुदगुल्यांबरोबर ओरखाडेहि काढतात. पण शामराव ओकांच्या लिखाणांत गुद्यांबरोबर गुदगुल्याहि असतात. सनातनी लोकांची जुनाट रूढीस चिकटून बसण्याची वृत्ति पाहून शामराव ओकांनीं त्यांना बरेच वेळां कोपरखळ्या दिल्या आहेत. आणि छापखानेवाल्यांच्या अकलेचे नमुने त्यांनीं तितक्याच कसोशीनें सादर केले आहेत. शामराव ओकांनीं लिहिलेली 'सनातनी विरुद्ध नवमतवादी यांची क्रिकेट मॅच' पुण्यात सात वर्षांपूर्वीं झालेल्या पुण्या-मुंबईच्या क्रिकेट मॅच इतकीच लोकांच्या स्मरणात राहील. शामराव ओकांच्या विनोदी लेखांचा संग्रह प्रथम 'कोपरखळ्या' या नांवानें प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्यांनीं 'चोरबाजारांतील चिजा', 'गलोल', 'बाभळवनांत', 'मालगाडी' वगैरे अनेक लेखसंग्रह प्रसिद्ध केले. परंतु त्यांचा विशेष नांवाजलेला आणि मला जो प्रामुख्यानें आवडतो असा 'चोरबाजारांतील चिजा' हा संग्रह होय. पाश्चात्य लेखकांच्या रूपांतरित लघुकथांचा हा संग्रह आहे. या संग्रहांतील प्रत्येक गोष्ट आकर्षक असून तिचा शेवट चमत्कृतिजन्य असा

आहे. असा चमत्कृतिजन्य शेवट असलेली ' ऑलिव्हर गोल्डस्मिथ 'नें लिहिलेली एक कविता आहे. त्यातील गोष्ट सहज आठवली म्हणून सांगतों.

एका गावांत एक सभ्य गृहस्थ राहात होता. त्याची हुशारी, त्याचें उदार अंतःकरण पाहून प्रत्येकाला त्याच्याशीं आपली मैत्री असावी असें वाटत असे. एक दिवस त्या सभ्य गृहस्थाच्या आळींतील व्यायलेल्या एका कुत्रीचें पिल्लूं त्यानें घरीं आणलें, आणि पाळलें त्यानें तें. कुत्रें कालमानानुसार मोठमोठें होऊं लागलें. कुत्र्याला तो स्वतःच न्हाऊं घालीत असे. त्याला खायला तोच आणून देई. जरा कुठें बाहेर गेला तरी त्याला तो बाहेर नेत असे. बाहेर जाताना बरोबर तें कुत्रें नसलें म्हणजे त्याला चुकल्याचुकल्यासारखें वाटे. आणि मग कुत्र्यालाहि त्याचा विरह सहन होत नसे. एक दिवस त्या गृहस्थाचें चित्त काहीं कारणानें भडकलें. आणि रागाच्या झपाट्यांत त्यानें कुत्र्याला उगीचच मारलें ! कुत्र्याच्या रागाचा पारा अनिवार झाल्यामुळें कुत्राही वेडा झाला ! पिसाळला ! आणि एक दिवस सरळ त्यानें आपल्या मालकाचा चावा घेतला ! गावांतले लोक म्हणूं लागले--' आधीं कुत्रा वेडा झालेला, पिसाळलेला, आणि अशा स्थितींत तो या गृहस्थाला चावला. हा गृहस्थ आता त्या कुत्र्याचं वीष बाधून मरणार. '-- लोकाना वाईट वाटलें.

येथपर्यंत मीं गोष्ट सांगितल्यावर आपल्याला वाटलें असेल कीं तो गृहस्थ मरणार. पण या गोष्टीचा-- कवितेचा-- शेवट गोल्डास्मिथनें कसा केला आहे पाहा-- गोल्डास्मिथनें शेवटची कविता लिहिली--

> But soon a wonder came to light,
> That showed the rogues they lied;
> The man recovered of the bite,
> The dog it was that died.

काय, आहे कीं नाहीं या कवितेचा शेवट चमत्कारिक ? या कवितेला गोल्डस्मिथनें नांव दिलें होतें, ' 'The elegy on the death of a mad dog ', ' पिसाळलेल्या कुत्र्याच्या निधनाची विलापिका !-- '

अशा तऱ्हेनें आकर्षक शेवट करण्यानें वाचक गुंग होतो आणि लेखकाच्या लिखाणाचें सार्थक होतें. शामराव ओक या कसोटीला पुरेपूर उतरले आहेत.

शामराव ओकांनीं ' हवेवर ' या संग्रहांत त्यांनीं लिहिलेल्या छोट्या प्रहसनांचा समावेश केला आहे. पण त्यांच्या विनोदी लेखांइतकीं तीं खास आकर्षक नाहींत, असें माझें खरें मत आहे.

शामराव ओकांच्यासंबंधीं अत्र्यानीं ' नवयुग 'मध्यें लिहिलेला ' शामराव ओकांच्या विनोदी ओकाऱ्या ! ' हा लेख मला फारच आवडला. शामराव बदलत्या आसनाप्रमाणें विनोदी लेख लिहितात हे अत्र्यांचे उद्गार मला एकदम मान्य आहेत. एकाद्या सनातनी म्हणजे पुरुषार्थ–सह्याद्रि वगैरे मासिकांत विनोदी लेख लिहितांना ते सोंवळ्यानें लिहिण्यास बसतील, आणि ' समाजस्वास्थ्यात ' लिहितांना ते कटीचें सोडून डोक्याला गुंडाळून लिहूं लागतील. हें कल्पनारम्य चित्र सत्यसृष्टींत केव्हां घडून येईल याचा नेम सांगतां येत नाहीं.

शामरावांचा दा. न. शिखरे यांच्या ' अग्रणी 'मधून येणारा चिनी-मातीच्या बरणींतील विनोदाचा मालमसाला अगदींच कुबट होता.

शामराव, आपल्याला कडवट वाटेल असें मीं आपल्यासंबंधीं लिहिलें असलें जरी साहित्यनिर्मिति आपण थांबवूं नका. इंग्रजी बोलपट सुरू होण्या-पूर्वीं जसे दोन–दोन भागांचे विनोदी बोलपट असतात–– आणि त्यांत ज्याप्रमाणें लॉरेल–हार्डी, बस्टर कीटन, हॅरोल्ड लॉइड, चार्ली चॅपलीन, वगैरे विनोदी नट भूमिका करतात, अगदीं त्याच चालीवर मराठी बोलपट-निर्मात्यांनीं असे छोटे छोटे बोलपट शामराव ओकांसारख्या विनोदी लेखकां-कडून लिहून घ्यावेत; आणि त्यांत मा. छोटू, दामुअण्णा मालवणकर, गोप, दीक्षित, जोग, बापुराव पवार वगैरेंना भूमिका द्याव्यात. माझ्या सूचनेचा मराठी बोलपट-निर्मात्यांनीं विचार करावा आणि असा प्रयत्न जर झालाच तर शामरावांनीं यश मिळवावें ही माझी खरी अपेक्षा आहे.

---

## ५ : बाबुराव पटेल

मला नक्की आठवतो आहे तो प्रसंग ! दोनतीन वर्षांपूर्वीच्या दिवाळींत मी मुंबईस गेलों होतों. ज्या ज्या वेळीं मी मुंबईस जातों त्या त्या वेळीं काळबादेवीवरील खाराकुवा विहिरीशेजारीं सोन्याचांदीची पेढी असलेल्या माझ्या एका धनाढ्य गुजराथी दोस्ताकडे मी उतरतों. मी त्याच्याकडे आलों आहें असें कळतांच मला जर प्रथम कोणी भेटावयास येत असेल– तर तो म्हणजे माझा एक बोहरी जानी दोस्त ! मुंबईत तो एका इंग्रजी वर्तमान-पत्रांत सहसंपादक आहे. मी फर्ग्यूसन कॉलेजांत शिकत असतांना तो माझा सहाध्यायी होता; इतकेंच नव्हे तर माझ्या आग्रहावरून त्यानें बी. ए. च्या परीक्षेसाठीं मराठी हा ऐच्छिक विषयही घेतला होता. त्या वर्षीच्या दिवाळींत मी माझ्या गुजराथी दोस्ताकडे उतरलों असतांना, त्याच्याच आग्रहावरून आम्ही तिघे एक दिवस क्रिकेट क्लब ऑफ इंडियाच्या पॅव्हेलियनवर एका फिल्म कंपनीच्या मालकानें दिलेल्या खान्याला गेलों होतों. आम्ही तिघे तेथें बरोबर साताला जाऊन पोहोंचलों. आणि पांचच मिनिटांत बाकीचे निमंत्रित पाहुणे आपआपल्या जागीं येऊन बसलेसुद्धां ! सुरुवातीला त्या फिल्म कंपनीच्या गलेलठ्ठ मालकानें आपल्या आगामी बोलपटाची ( खान्यापूर्वीच ) पोट भरभरून स्तुति केल्यावर खान्याला सुरुवात झाली. तोंच माझा गुजराथी दोस्त माझ्या डाव्या हाताला कोपरखळी मारून म्हणाला––" तारी सामे खुरशीपर बेठेलो छे तेज बाबुराव पटेल ने ! ––" माझ्या गुजराथी दोस्ताचें तें कुजबुजणें ऐकून माझ्या उजवीकडे बसलेला बोहरी दोस्त उद्गारला––" और आपने यह नहीं बताया के उनके बाएं ओर बैठी सो उनकी प्रायव्हेट सेक्रेटरी सुशिलाराणी है !"

वर वर्णन केलेल्या प्रसंगीं मी साडेपांच फूट उंचीची जाडजूड देहयष्टी असलेली बाबुराव पटेल ही व्यक्ति प्रथम पाहिली. आणि ती सुद्धां कृश शरिराच्या सुशिलाराणींच्या सान्निध्यांत !

हिंदी बोलपटसृष्टींत पांच 'बाबुराव' प्रसिद्ध आहेत ! बाबुराव पेंटर, बाबुराव पै, बाबुराव पेंढारकर, बाबुराव अत्रे, आणि बाबुराव पटेल ! बाबुराव पेंटर हे चित्रकलेंतील महर्षि असल्यामुळें त्यांची धीरगंभीर मुद्रा पाहून त्यांच्यापुढें कोणीहि आदरानें मानच लववील. बाबूराव पै हे आडनांवानें पै असले तरी सिनेमा धंद्यांत पै पै करून त्यांनीं बराच पैसा मिळविल्याकारणानें त्यांना बाबूराव कुबेर म्हणणें जास्त शोभेल ! बाबुराव पेंढारकर यांनीं बोलपटांतून खलनायकापासून हीरोपर्यंत कोणतीही भूमिका तितक्याच तडफेनें आणि आत्मीयतेनें केल्यामुळें हिंदुस्थानांतील अव्वल दर्जाचा एकमेव नट म्हणूनच ह्याचा गौरव करावा लागेल. बाबूराव अत्रे ! यांच्याबद्दल काय जास्त सांगणार ? आणि बाबुराव पटेल ? हिंदुस्थानांतील श्रेष्ठ दर्जाच्या 'फिल्म इंडिया' या सिनेमाविषयक इंग्रजी मासिकाचे संपादक !-- कांहीं वर्षांपूर्वीं मुंबईत भरलेल्या इंडियन मोशन पिक्चरमध्यें ऑल इंडिया फिल्म जर्नालिस्टांची जी परिषद झाली तिचे Self made ( स्वयंभू ) अध्यक्ष !

'फिल्म इंडिया' या मासिकांत एका वाचकानें विचारलेल्या सवालाला बाबुराव पटेलानीं दिलेल्या जबाबानें आपली बदनामी झाली या सबबीवर, त्या वेळीं पुण्याच्या 'प्रभात फिल्म कंपनी'त असलेली सुप्रसिद्ध नटी कु. शांता आपटे हिनें आपल्याबरोबर दहा-बारा मंडळींचा जथा घेऊन पुरुषी वेषांत 'फिल्म इंडिया'च्या कचेरींत बाबुराव पटेलांची गांठ घेतली आणि त्यांना दोन छड्या लगावून आणि चार गोष्टी सुनावून तेथून कूच केलें. या खळबळ उडविणाऱ्या बातमीमुळेंच 'बाबुराव पटेल' ही व्यक्ति अखिल हिंदुस्थानला माहित झाली.

चंदेरी पडद्यावर चमकण्यांत आसुसलेल्या नट-नटी ज्याप्रमाणें आपलें पाळण्यांतील ओबडधोबड नांव टाकून देऊन नाजुक नांव धारण करतात, अगदीं त्याच चालीवर बाबुरावांनीं त्यांचें 'पाटील' हें मराठमोळा नांव टाकून 'पटेल' हें 'बनिया' नांव धारण केलें. 'फिल्म इंडियां'तील

खेळकर, विनोदी इंग्रजी लिहिणारी बाबुराव पटेल ही व्यक्ति फक्त इंग्रजी पांचच यत्ता शिकलेली आहे हें किती जणांना माहित असेल ? बाबुराव पटेलांचे वडील मुंबईतील एक प्रसिद्ध वकील असून, पूर्वीचे सॉलिसिटर आणि हल्लींचे पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर यांचे जीवश्चकंठश्च स्नेही आहेत. बाबुराव पटेलांनीं जरी बंगाली कलावंतानीं काढलेल्या 'डॉक्टर' या बोलपटाची फिल्म-इंडियांतून यापूर्वींच रेवडी उडवलेली असली तरी बाबुराव पटेलांची बहीण लीला पाटील ही खुद्द डॉक्टरच असून तिचें एका बंगाली डॉक्टराशींच लग्न झालें आहे. 'समाजस्वास्थ'कारानी १९४३ मार्च महिन्यांत प्रसिद्ध केलेल्या 'दोन बायका' या अंकात बाबुराव पटेलाचे स्वानुभव छापायला हरकत नव्हती असें मीं म्हटलें तर आपल्या लक्षात येईल मला काय सुचवायचें आहे तें ! आपल्याला स्वातंत्र्य असतें आणि भरपूर पैसाही असता तर आपण एकाद्या रंगेल आणि दिलदार मोगल बादशहाप्रमाणें जनानखाना पाळला असता, असें खाजगी बैठकींत बाबुरावांनीं कितीकदां तरी बोलून दाखवलें आहे. बाबुराव पटेलांना त्यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरीच्या जागीं बाईचीच नेमणूक करण्याचा नाद लागला आहे असें मीं म्हटल्यास बाबुराव माझ्यावर रागावणार नाहींत अशी मला आशा आहे. बाबुराव जेव्हां आपल्या मासिकांतून त्या प्रायव्हेट सेक्रेटरीची भरमसाट स्तुति करतात, ती पाहून मात्र मला खरोखरच चीड येते. त्यानीं या बाबतींत जरा हात आंखडता घ्यावा अशी माझी त्याना सूचना आहे.

बाबुराव पटेल सिनेमा धंद्याच्या सर्व क्षेत्रात अनेक प्रकारचे खेळ करून बसले आहेत. 'महाराष्ट्र फिल्म कंपनीं'त त्यांनीं मॅनेजर म्हणून काम केलें आहे. इतकेंच नव्हे तर, त्या कंपनीनें काढलेल्या 'राणी रूपमती' या बोलपटांत त्यांनीं एक भूमिकाहि केल्याचें मला नक्की स्मरतें. या कंपनींतून बाहेर पडल्यावर ते श्री. महिन्द्रकर यांच्या 'महाराष्ट्र सिनेटोन'मध्यें कांहीं दिवस सूत्रचालक म्हणून राहिले; आणि दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, या कंपनीनें गाजावाजा करून काढलेला 'पृथ्विराज-संयोगिता' हा ऐतिहासिक बोलपट सपशेल पडला ! तेव्हां बाबुराव पटेलानीं तेथून काढता पाय घेऊन, स्वतःची 'गंधर्व सिनेटोन' स्थापली. आणि कळाविण्यास अत्यंत वाईट

वाटतें कीं या कंपनीचीही स्थिती अल्पावकाशात शोचनीय होऊन त्यांतच तिचा अंत झाला ! ( ईश्वर ' गंधर्व सिनेटोन 'ला सद्गति देवो ! ) लेखक, दिग्दर्शक, नट, प्रोडयूसर, डिस्ट्रिब्युटर वगैरे सिनेमाच्या सर्व क्षेत्रांत वणवण फिरून, इतकी अनुकंपनीय स्थिति माझ्या माहितीप्रमाणें एकाचीच झाली आहे. सिनेमा क्षेत्रांत, वृत्तपत्रसृष्टींत, आणि रंगभूमीवर अनंतरंगी खेळ खेळून, गरगरा गरगरा फिरून अजून आहे तेथेंच राहणाऱ्या गृहस्थाची आठवण झाली कीं, डोळ्यातून ठिबकणारे अश्रू त्याच्याच उपरण्यानें पुसण्याचा मोह मला आवरतां येत नाहीं ! बाबुराव पटेलांची स्थिति मात्र कांहीं दिवसांनीं बदलली. त्यांना त्यांचें खरें स्थान उमगत नव्हतें. पण अखेर तें सापडलें ! " A critic is that, who has failed as a creative writer. " हें डिस्रायलचें वाक्य त्यांच्या वाचनांत आलें असावें. बाबुरावांनीं सिनेमाविषयाला वाहिलेलें ' फिल्म इंडिया ' हें इंग्रजी मासिक सुरू केलें, आणि अखेर बाबूराव पटेलांना त्यांची खरी खुर्ची सांपडली. ते टीकाकार बनले !

' फिल्म इंडिया ' सारखें उच्च दर्जाचें आणि बोलपट सृष्टींतील सांगोपांग माहिती चटकदार भाषेंत पुरविणारें दुसरें इंग्रजी अगर मराठी सिनेमाविषयक मासिक नाहीं. बाबुराव पटेलांचें इंग्रजी स्वायसी असतें. त्यांच्या मासिकाची स्तुती ' टाइम ' या अमेरिकन नियतकालिकानें केली आहे.

फिल्म इंडियांत बाबुराव पटेलांना एकानें सवाल केला होता——

" Are there any raw film manufacturers in India ? " — या सवालाला बाबूराव पटेलांनीं जबाब दिला होता—— " No. But here we have directors who expose the film and make its more raw than ever before. " . आणि नवलाची गोष्ट ही कीं हा सवाल-जबाब ' टाइम 'नें आपल्या एका अंकांत उद्धृत केला होता. मध्यंतरी माझ्याकडे आलेले एक धारवाडचे स्नेही— कीं जे कर्नाटकांत साहित्यिक म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांना मी ' फिल्म इंडिया 'संबंधीं विचारतांच ते म्हणाले होते, " That Magazine contains beautiful phrases and it is spread all over Karnatak. " धारवाडी कांट्यांतून तोललेलें हें मत

'फिल्म इंडियाची' लोकप्रियता अजमावण्यास पुरेसें आहे. 'फिल्म इंडियात' येणाऱ्या बोलपट अभिप्रायानें कोणता बोलपट पाहावा आणि कोणता बोलपट पाहण्याचें टाळावें हें अचूक समजतें. बहुतेक अभिप्राय मुद्देतोड असतात.

बाबुराव पटेलांचें इंग्रजी कमें खेळकर आणि खोडकर असतें याचीं तीनच उदाहरणें मी देतों.

'फेमस पिक्चर्स'चे बाबुराव पै यांच्याबद्दल त्यांनीं एकदा लिहिलें होतें—"Famous! Meet a friend, Mr. Baburao Pai the young proprietor of Famous Pictures of Bombay."

कु. शांता आपटेबद्दल बाबुरावांनीं लिहिलें होतें—"Irresistible! come, come, know this glorious flower of youth Shanta Apte, who has given beautiful dreams & horried nightmares to the young & the old."

बाबुराव पेंढारकरांबद्दल ते म्हणतात—"Subtle! Meet the greatest artiste of our Film-world, Mr. Baburao Pendharkar. In private life, he is a splendid friend, a brilliant drawing room mean, never ruffled & ever polite.

काहीं वेळेला बोलपटावर टीकेसाठीं टीका करणाऱ्या बोलबहाद्दरांचीं उदाहरणें मला माहीत आहेत. आपल्या आवडीनिवडीनुसार ते बोलपटावर टीका करीत असतात. आपल्या अभिप्रायानें बोलपट निर्मात्याला एक तर खूप चढवायचें, नाहीं तर सपशेल पाडावयाचें एवढाच त्यांचा बेत असतो. जाहिरातीचा तोबरा दिला कीं, वर्तमानपत्राच्या संपादकानें स्वतंत्र मतें गहाण टाकून आपल्या पाठीमागें एखाद्या तट्टाप्रमाणें यावें अशी सिनेमावाल्यांची अपेक्षा असते. काहीं वृत्तपत्रांचे मालक वृत्तपत्रीय प्रामाणिकपणा ही विकाऊ चीज नाहीं हें सिनेमाधंदेवाल्यांना दाखवून देतात, तर काहींजण सिनेमाधंदेवाल्यांच्या पुढें मान तुकवून त्यांच्याकडून येणारा राइटअपच स्वतःचा अभिप्राय म्हणून बेधडक छापून मोकळे होतात. आणि त्यामुळें

काहीं वाचकांची दिशाभूल करतात. पण बहुतेक वाचकवर्ग आतां जाहिरातीला भुलून बोलपट पाहण्याइतका दुबळा राहिलेला नाहीं. चित्रपटाची Mouth to Mouth होणारी पब्लिसिटीच चित्रपटाला यश मिळवून देत असते.

बाबुराव पटेल खाजगी बैठकींत नेहमीं म्हणतात, "ज्याच्या पत्राचें लोकानीं तीर्थ घ्यावें, असा आदर्श संपादक मी नाहीं. मी प्रॅक्टिकल मनुष्य आहें. माझा धंदा मी जाणतों. महिन्याला कुठूनही कसेंही करून १५०० रु. मिळवावे हे माझें प्रिन्सिपल आहे. प्रोडयूसराना चढवलें पाहिजे. वेळ प्रसंगीं आपल्या मतलबासाठीं त्यांना चुचकारलें पाहिजे. आणि आपल्या डोक्यावर चढून बसण्याइतके ते शेफारून गेले कीं, त्याना दोन रपाटेही द्यायला पाहिजेत." बाबुराव पटेलांचे हे उद्गार खाजगी आहेत. पण त्यानीं ही वृत्ती सोडून देणें आवश्यक आहे. ते बोलपटावर निर्भीड टीका करतात खरे, पण बोलपट-निर्मात्याच्या बाबतींत त्यांचें धोरण काहीं वेळा तरी पक्षपातीपणाचें असणें हें खरें आहे. शांतारामबापूंनीं एकदा जाहीर भाषणांत सांगितल्याप्रमाणें टीका विधायक हवी, विघातक नको. टीकाकारानें कोणत्याही झब्बूशाहीचें हस्तक नसलें पाहिजे. निर्मात्याच्या कृतीकडे त्यानें व्यापक दृष्टिकोनातून पाहिलें पाहिजे. दोषालाच केवळ प्राधान्य न देतां, गुणग्राहकता व अचुक दोष-दर्शन हे गुण टीकाकाराच्या अंगीं असणें अगदीं आवश्यक आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकराची मोरोपंताच्या काव्यावर जी टीका प्रसिद्ध आहे, तशीच टीका इतरत्र व्हावयास हवी. खाडिलकरांच्या 'मेनका' या नाटकावर पक्षाभिनिवेशानें लिहिलेली नरसोपंती टीका समतोल म्हणून कधींच समजली जाणार नाहीं. डॉ. जॉन्सन यानें पोप व ॲडिसन यांच्यावर टीका केली आहे. तशी टीका आदर्श म्हणून समजावी लागेल.

बाबुराव पटेल यांच्यामध्यें एक ढोबळ दोष आहे तो दाखवून देणें माझें कर्तव्य आहे. आणि तो त्यानाही नाकारता येणार नाहीं. शांता आपटे पूर्वीच मद्रासला जाऊन भाव खाऊन परत आली. शांतारामबापूंनीं मद्रासची सफर करून बरीच लोकप्रियता मिळविली. पण या दोघांनीं या

कारणास्तव मद्रासी कलावंतांची भरमसाट स्तुती कधींच केली नाहीं. मात्र बाबुराव पटेल यांनीं मद्रासला जाऊन परत आल्यापासून सार–भाताच्या करपट ढेंकरा द्यावयास सुरवात केली आहे. त्यांनीं आजकाल चालवलेली मद्रासी कलावंतांची जाहिरातबाजी तत्काळ थांबवावी अशी माझी त्याना सूचना आहे.

बाबुराव पटेलांसारखी सुंदर टीका मराठींत माझ्या माहितीप्रमाणें ' धनुर्धारी ' या साप्ताहिकांत लिहिणारे ' संजय 'च करूं शकतात; बाकी कोणीहि नाहीं. बाबुराव पटेलाना मराठी कितपत लिहितां येतें हें मला माहित नाहीं. परंतु त्यांनीं मराठी सिनेमा साप्ताहिक काढून मराठी वाचकांच्या अपेक्षेला पूर्णता आणावी अशी माझी त्यांच्याबद्दल अपेक्षा आहे. Baburao, please note it.

' फिल्म इंडिया 'नें एवढी लोकप्रियता मिळवली आहे कीं, त्याचें स्मारक म्हणूनच कीं काय नैरोबी येथें बांधण्यात आलेल्या टोलेजंग बोलपट गृहाला ' फिल्म इंडिया ' हें नांव देण्यांत आलें आहे.

मराठी वाचकांना पुरोगामी वाङ्मय पुरविणाऱ्या नियतकालिकांच्या संपादकांत श्रेष्ठ संपादक कोणाला म्हणावें असें जर मला कोणीं विचारलें तर मी श्री. शंकरराव किर्लोस्करांकडे बोट दाखवीन. मराठी साप्ताहिक लोकप्रिय करावयाचें तर कोणत्या संपादकाचें चित्र डोळ्यापुढें ठेवावें अशी कोणीं पृच्छा केली, तर मी मोतीराम रांगणेकराचाच उल्लेख करीन. अगदीं तद्रूतच सर्वस्वी सिनेमाधंद्याला वाहिलेलें मासिक काढावयाचें आहे तर कोणाचा आदर्श डोळ्यापुढें ठेवावा असें कोणीं विचारतांच नांव सुचवायचेंच असेल, तर मी नांव घेईन बाबुराव पटेलांचेंच.

# ६ : वि. वि. बोकील

पुण्याच्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या नूतन मराठी विद्यालयात श्रीयुत वि. वि. बोकील आज सहा-सात वर्षे शिक्षक म्हणून ज्ञानापर्णाचें पवित्र कार्य करीत आहेत. एके दिवशीं प्रथमच ते मॅट्रिकच्या एका वर्गावर शिकवायला गेले. वर्गांत प्रवेश केल्यानंतर ते कांहीं बोलायला सुरुवात करणार, इतक्यांत आपल्या नेहमींच्या वृत्तीला अनुसरून विद्यार्थ्यांनीं एकच गिल्ला केला —

' नांव घ्या ! नांव घ्या ! ! '

बोकील हें ऐकून नुसते हंसले. आणि मुलांकडे पाठ वळवून आपल्या उजव्या हातांतील खडूनें त्यांनीं फळयावर लिहिलें—

' वि. वि. बोकील '

बोकिलांनीं असें लिहून मुलांकडे तोंड वळवायला आणि एका मुलानें उभें राहून प्रश्न विचारायला एकच गांठ पडली.

त्या मुलानें विचारलें—-

" सर, तुमचं आणि पेशवाईतील सखारामपंत बोकील यांचं कांहीं नातं आहे का हो ? "

बोकिलांनीं यावर काय उत्तर दिलें असेल असें वाटतें तुम्हांला ?

त्या वात्रट विद्यार्थ्याचा खवचट प्रश्न ऐकून बोकील गंभीर मुद्रा करून शांतपणें म्हणाले—

" प्रो. फडके यांचं पेशवाईतील हरिपंत फडक्यांशीं जे नातं असेल, तेंच माझं सखारामपंत बोकिलांशीं आहे. "

त्या बाबत विद्यार्थ्यांचें या उत्तराने समाधान झालें असेल कीं नाहीं हें कांहीं मला ठाऊक नाहीं. पण या उत्तरात बोकिलांच्या विनोदी स्वभावाचें प्रतिबिंब पडलेलें आहे हे आपल्याला निश्चितपणे दिसून येते. बोकिलांनीं प्रसवलेल्या त्यांच्या एका वाङ्मयापत्याचें नांव 'साडेतीन शहाणे' आहे हें ऐकून मी मात्र म्हणेन कीं, बोकील हे सखारामपंत बोकिलाचे जवळचे नसले तरी दूरचे नातेवाईक खासच आहेत.

'Leaders are usually pleaders' – पुढारी बहुधा कायदेपंडित असतात. त्याचप्रमाणें बरेचसे लेखक शिक्षक असतात असें म्हणणें खास चुकीचे ठरणार नाही. प्रो फडके, खाडेकर, अत्रे, काणेकर, आळतेकर, न. र. फाटक वगैरे श्रेष्ठ प्रतीचे साहित्यिक शिक्षकच आहेत; आणि आमचे बोकील सुद्धा त्याच वर्गांत मोडतात.

कॉलेजात ज्याचा अभ्यासक्रम यथा-तथाच असतो व तो पदवी-परीक्षेची सरहद्द काठावरच ओलांडतो, त्याला इकडे पंतोजी किंवा तिकडे कारकून होण्यापलीकडे मार्गच नसतो. बोकिलांनीं कॉलेज-परिक्षाच्या पहिल्या अगर दुसऱ्या वर्गांत कधींच प्रवेश केला नाही. बहुजनसमाजाप्रमाणें थर्ड क्लासातून प्रवास करण्यांत त्याना मौज वाटत होती कीं काय हें मला कांहीं ठाऊक नाहीं. बोकीलांनीं बी. ए. झाल्यावर बी. टी. चा टिळा लावून 'शिक्षक एके शिक्षक' हा पाढा गिरवण्यास सुरवात केली. दोन-चार शाळा हिंडून आल्यावर भरभराटीस आलेल्या नूतन मराठी विद्यालयात नाना नारळकराच्या कारकीर्दीत ते येऊन दाखल झाले. आणि तेथेंच ते आयुष्याला स्थिरता आणण्याच्या प्रयत्नांत आहेत.

बोकील हे लेखक म्हणून १९२९ सालीं जन्माला आले. गणेश महादेव आणि कंपनीच्या 'यशवंत' मासिकांत 'कटु-सत्य' ही त्यांची 'गोड' लघुकथा प्रसिद्ध झाली; आणि मराठी वाचकवर्गाला ज्याच्या लघुकथांनीं चटका लागेल असा एक नवा लेखक साहित्यक्षेत्रांत उदयास आला. यानंतर बोकील भराभर आणि माराभर लिहूं लागले. त्यांच्या 'तरेचा संसार' सुरू झाला. त्यांनीं 'देवी' ही अविस्मरणीय गोष्ट लिहिली. 'टारझान' हा बोलपट काढणाऱ्या सिनेमाकंपनीनें प्रथम 'टारझान' हा बोलपट चित्रित

केला. त्यानंतर 'टारझान अँड हिज मेट' हा बोलपट प्रकाशित केला. एवढ्यावरच न थांबता 'टारझान फाइंडस् ए सन्' हाहि बोलपट काढला! टारझानच्या कुटुंबावरच बोलपट काढायचें त्या कंपनीनें ठरवलें असावें. अगदीं याचप्रमाणें बोकिलांनीं प्रथम 'बेबी'ला जन्म दिला. नंतर तिला खेळण्यासाठीं भाऊ पाहिजे या हेतूनें त्यांनीं 'बेबीचा भाऊ' निर्माण केला! आणि बेबीचें लग्न झाल्यावर तिच्या भावाला खेळण्यासाठीं एकादी पाठची बहीण असावी असें ठरवून त्यानीं 'बेबीची बहीण' निर्माण केली! आतां बोकिलांनीं बेबीच्या आईबापांचाच उद्धार करायचें काय तें बाकी ठेवलें आहे. बोकिलांनीं हा प्रयत्न न करणेंच जास्त श्रेयस्कर. कारण या प्रयत्नात 'बेबी'चे जनक तेच असल्यामुळें त्याचाच उद्धार त्यांनींच केल्यासारखा होईल!

बोकील वरुणराजाचे भक्त असावेत अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. त्यांना सर्व ऋतूंत पावसाळा विशेषेंकरून आवडत असावा असें मला वाटतें; आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या काव्यसंग्रहांना 'वळवांचे पाऊस'— 'गाराचा वर्षाव' 'झिमझिम' हीं पावसाळी नावें दिलीं असावींत. विवाहित स्त्रीपुरुषांमधील सहजमनोहर संवाद, जरूरीपुरताच नर्म विनोद आणि जातां जाता फारसें न बोंचतील असे घेतलेले रेशमी चिमटे, हे गुण त्यांच्या लघुकथामधून प्रामुख्यानें दिसून येतात. कॉलेजमधील तरुण तरुणींच्या शेखमहंमदी मनोराज्यांची आणि नेहमीं नव्याचा हव्यास घेणाऱ्या सुशिक्षित स्त्रियांची गुदगुल्या करीत उडवलेली टर त्यांच्या पूर्वीच्या लघुकथातून पानापानांतून दृष्टोत्पत्तीस येते. त्याचें हें वैशिष्ट्य ओळखून मराठी वाचकवर्गानें त्याचें यथोचित स्वागत केलें, आणि अगदीं थोड्या अवधींत कोणत्याहि मराठी लेखकाला न मिळणारा मांन त्यांना मिळाला. 'आम्हांला लघुकथा पाहिजेत' असा वाचकांनीं कितीहि आक्रोश केला तरी त्यांची मागणी पुरी करण्याकरितां 'घे हातीं लेखणी आणि खरड एकादी लघुकथा' असें धोरण लेखकानें अंमलांत न आणतां 'A story should always be too good to be True' या न्यायानुसार लघुकथा लिहिल्या पाहिजेत. बोकिलांच्या आजकालच्या लघुकथा त्यांच्या पूर्वीच्या लघुकथांप्रमाणें सर्वांगसुंदर तर नाहींतच, उलट हल्लींच्या त्यांच्या लघुकथां-

म्हणून फापट पसारा अतिशय असतो, असें मला नाइलाजानें म्हणावें लागत आहे. बोकिलांनी शक्य असल्यास याचा विचार करावा.

उपरोधानें पुरेपूर भरलेली ' फोल आशा ' ही कादंबरी जेव्हां बोकिलांनी लिहिली तेव्हांच ' बोकीलांनी कादंबऱ्या लिहाव्यात ' ही मनांत असलेली माझी अपेक्षा सफल झाली. बोकील हे शिक्षक आहेत. इतकेंच नव्हे तर बार्शीचें सुलाखे हायस्कूल, जुन्नरचें 'बाबा स्कूल' व चोपड्याची शाळा यांतून शिक्षकांना जीवनाच्या किती बिकट परिस्थितींतून जावें लागतें याचा त्यांनीं पूर्ण अनुभव घेतला आहे. ते त्या वर्गाचे प्रतिनिधि आहेत. शिक्षकांची गाऱ्हाणीं हेडमास्तराच्या वेशीवर टांगणारी त्याची ' झंझावात ' ही कादंबरी वाचली कीं, बोकील वास्तववादी जीवनाचें चित्र किती आत्मीयतेनें रेखाट-तात याची प्रतीति येते. ' मंगळागौरीच्या रात्रीं ', ' चल पुढें ' वगैरे हल्लींच्या त्यांच्या कादंबऱ्यांतून कोठलाच प्रश्न विशेषत्वानें चर्चिला नसल्यामुळें दोन घटका मनरंजन करणाऱ्या कादंबऱ्या असाच मी त्यांचा उल्लेख करीन.

विनोदाला क्रिकेटमधील उपमा दिली तर आपल्याला असें म्हणता येईल कीं—— आचार्य अत्रे हे वाङ्मयाच्या क्रीडांगणांत ' विनोदाची सिक्सर ' ठोकतात ! चिं. वि. जोशी ' बाऊंडरी मारतात ! आणि बोकील ' दोन रन्स ' वरच भागवतात. याचप्रमाणें अत्रे हे सात मजली हंशा पिकवतात, चिं. वि. जोशी पोट धरधरून हंसायला लावतात, आणि बोकील नुसतें स्मित करावयास लावतात, असेंही अपल्याला म्हणता येईल. बोकिलांना नर्मविनोदाचे प्रणेते असें कोणीं टीकाकारानें संबोधलें असल्याचें मला स्मरतें. तें अगदीं योग्य आहे अशी माझी शिफारस आहे.

रामप्रहरीं तुपानं ओथंबलेला शिरा खाणारे म्हणून प्रसिद्ध असलेले भालाकार भोपटकर यांच्याकडे जाऊन आपण ' पंचपक्वान्नांची पंगत ' या विषयावर लेख मागण्याऐवजीं ' सहभोजनावरील ' लेखाची अपेक्षा केली तर आपल्याला नुसतें जिभल्या चाटीतच परत यावें लागेल ! शास्त्रोक्त गाणाऱ्या ( ओरडणाऱ्या नव्हे ! ) पंडित विनायकबुवा पटवर्धन यांच्याकडे जाऊन जर आपण लोकप्रिय होणाऱ्या पदांच्या चालींची मागणी केली तर आपल्याला रडगाणें गातच परतल्यावांचून उपाय राहणार नाहीं. चित्रकलेंतील

मर्हर्षि बाबुराव पेंटर यांच्याजवळ जर आपण कार्टून काढून द्या म्हटलें तर त्यांनीं शक्य नाहीं म्हणतांच आपला चेहेरा मात्र फोटो काढण्यासारखा होईल ! आणि याच चालीवर लघुकथा आणि कादंबऱ्या लिहून वाचकांची दोन घटका करमणुक करणाऱ्या बोकिलांकडून 'पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या हिंदुस्थानला नवचैतन्य प्राप्त होईल असा संदेश द्या' म्हणून अपेक्षा केली तर तें तितकेंच असमंजसपणाचें ठरेल ! राष्ट्रसेवा-ध्येयवाद-साम्यवाद, अमुक 'झम्' आणि तमुक 'इम्'चा 'ड्रम' त्यांनीं आपल्या लेखनातून कधींच वाजवला नाहीं. असा जयघोष करण्याचें कंकण त्यांनीं मनगटावर कधींच बांधलें नाहीं. त्याचप्रमाणें, मी बहुजन समाजाकरितां लिहितों आहें असा आक्रोशहि त्यांनीं कधीं केला नाहीं. तेव्हां त्यांच्याकडून तेजस्वी संदेशाची किंवा इतर लेखकांनीं बिघडवलेल्या तरुणांना ताळ्यावर आणील अशी वाङ्मयकृती आपण का अपेक्षावी ?

बोकिलांसंबंधीं माझ्या अपेक्षा काय आहेत याचा हा लेख लिहिण्यापूर्वी मी विचार करूं लागलों. आणि माझें एक मत निश्चित तयार झालें ! 'बोरू मोडा आणि बंदुका घ्या' असा साहित्यिकांना आदेश देणाऱ्या वीर सावरकरांनीं या विधानाला दुसरी बाजू आहे हें पाहिलें नाहीं. खांद्यावर बंदुका धारण करून आणि वेळप्रसंगीं शत्रूवर त्या उडवून विजय मिळवणाऱ्या वीरांचें वर्णन बोरूनें लिहिणारा साहित्यिकच करूं शकेल. बंदुकीनें मर्दुमकी गाजवून परत येणाऱ्या वीराची करमणूक बोरूनें लिहिणारा लेखकच करूं शकेल. बोकील, अशा विजयश्री मिळवून येणाऱ्या वीरांचें मनरंजन करणारें कथावाङ्मय आपण निर्माण करा. ऑफिसांतून त्रासून भागून परत आलेल्या कारकुनाची तासभर करमणूक व्हावी असें कथावाङ्मय आपण लिहा. आपण कथालेखक आहात, टीकाकार नव्हत ! कथालेखक म्हणूनच आपण जगा आणि यात लौकिक मिळवा अशी माझी आपणांस विनंति-आहे. य. गो. जोशी याचा पूर्वी कोणीं 'पांढरपेशा वर्गाच्या स्वैपाकघरांतील लेखक' असा गौरव केला होता ! बोकिलांचें कथावाङ्मय वांचून मी म्हणेन—"ते म्हटलं तर पांढरपेशा वर्गाच्या माजघरांतील लेखक आहेत- म्हटलं तर ओटीवरचे लेखक म्हणून त्यांना संबोधलं तरी हरकत नाहीं—"

बोकील, या प्रसंगीं आपल्याला एक गंभीर इशारा देण्याची माझ्यावर हकनाक पाळी आलेली आहे. आपण प्रथम 'मंगळागौरीच्या रात्रीं' ही कादंबरी लिहिलीत. पुढें 'पहिली मंगळागौर' या बोलपटांत तिचें रूपांतर केलेंत आणि नंतर तिला 'तारांबळ' या नाटिकेचा वेष दिलात! आपण अन्यांच्या पावलावर पाऊल टाकून चालत आहां! अन्यांनीं 'पराचा कावळा' हें नाटक लिहिल्यानंतर 'घरजांवई' हा सपशेल आपटी खालेला बोलपट काढला! अन्यांनीं 'राजाराणी' या बोलपटाचें रूपांतर 'राजाराणी' या नाटकांत करण्याचें योजलें होतें! आणि अगदीं अलिकडची 'अंदरकी बात' अशी आहे कीं, त्यांनीं 'दिल की बात' या बोलपटाचें 'पाणिग्रहण' या नाटकांत रूपांतर केलें आहे! बेबीच्या केंसांचा बॉबकट करून तिला बाबू बनवल्यानें लोक थोडेच फसणार आहेत? बोकील, आपण प्रतिभा-संपन्न आहांत, कथाकार म्हणून आजपर्यंत आपण गाजलां आहांत. तेव्हां कादंबरीला नाटिका बनवण्याची वास्तविक आपल्याला कांहींच जरूरी नाहीं. माझें हें विधान आपण लक्षांत घेतल्यास आपल्याला तें नक्की पटेल असा मला आत्मविश्वास आहे.

माझा एक स्नेही जेव्हां वि. वि. बोकीलांसंबंधीं कांहीं बोलतो, तेव्हां तो आपल्या भाषणास 'विनंती विशेष बोकील' अशी सुरुवात करतो. त्याचें हें म्हणणें थट्टेचें मानलें तरी एक गोष्ट आपल्या चटकन् लक्षांत येईल कीं, V. V. Bokil या इंग्रजी नांवांत व्ही. व्ही. दोनदां आहेत. व्ही. म्हणजे व्हिक्टरी होय. वाङ्मयांत तर बोकीलांनीं केव्हांच विजयश्री मिळवली आहे. पण 'पहिली मंगळागौर' आणि 'चिमुकला संसार' या बोल-पटांनीं त्यांनीं जो सिनेमाक्षेत्रांत प्रवेश केला आहे त्यांतही ते विजयश्री मिळवतील यांत मला बिलकूल शंका वाटत नाहीं.

## ७ : शं. वा. किर्लोस्कर

१९१९ सालीं पहिलें महायुद्ध संपलें ! १९२० सालीं लोकमान्य टिळकांनीं या नश्वर जगांतील आपली जीवनयात्रा संपवली ! आणि १९४५ सालीं दुसरें महायुद्ध संपलें ! पहिलें महायुद्ध संपून दुसरें महायुद्ध संपेपर्यंत सव्वीस वर्षांचा कालखंड झाला. या कालखंडाचें सिंहावलोकन करण्याचें जर आपण ठरवलें, तर एक गोष्ट आपल्या दृष्टोत्पत्तीस प्रामुख्यानें येईल. महाराष्ट्रांतील वैचारिक सागरावर या काळांत विविध नवविचारांच्या-- अनेक कलाकृतींच्या– आणि अनेक क्रांतीच्या लाटा उसळल्या. आणि गंमत ती हीच कीं, त्यांतूनच आपणांस ' शंख-शिंपले-आणि मोतीं ' यांचा लाभ झाला ! शंखांच्या नांवानें शंखध्वनि करण्याचें काम माझें नाहीं. बारा महिने फाल्गुनमास साजरा करणारे अन्य साहित्यिक तें करतील. शिंपले कांहीं सर्वच माणसांचें मन आकर्षून घेऊं शकत नाहींत. तेव्हां त्यांचाही विचार बाजूलाच ठेवणें भाग आहे. आतां राहतां राहिला प्रश्न मोत्यांचा ! आजकाल खऱ्या मोत्यांना बरीच कमी किंमत येते हें जरी खरें असलें तरी– आणि कल्चर्ड मोत्यांना जरी बराच भाव असला तरी– कल्चर्ड मोती आणि कल्चर्ड ( educated ) बफून्स यांत मी तरी कांहींच फरक करीत नाहीं. खरे मोती ते खरे मोतींच राहणार ! उपरिनिर्दिष्ट वैचारिक सागरांतून आपल्याला जे खरे मोती लाभले– ज्या सात अलौकिक आणि सुदैवानें अद्यापिहि हयात असलेल्या व्यक्ति मिळाल्या-- त्यांना मी ' सप्तर्षि ' या नांवानेंच संबोधीन !

या सप्तर्षींत सिंहासनावर बसण्याचा मान अर्थातच 'केसरी'चे माजी संपादक आणि वयोवृद्ध साहित्यसम्राट् श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचा आहे! सध्यां सुवर्ण खरेदी करण्यास जरी बरेंच महाग जात असलें तरी एकदोन वर्षांत त्याचा भाव बराचसा उतरेल अशी कल्पना करून मी म्हणतों कीं, श्री. न. चिं. केळकर यांचा उल्लेख भावी इतिहासकारांना सुवर्णाक्षरांतच करावा लागेल. सप्तर्षींकडे जर आपण पुनः पाहूं लागलों तर दुसरें स्थान स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांनीं विभूषित केल्याचें आपल्या नजरेस येईल. रत्नागिरीच्या बंदिस्त हद्दींतून सावरकराना मुक्त केल्यानंतर त्यांनीं अखिल हिंदुस्थानांत संचार करून हिंदुसंघटनेचें जें प्रचंड कार्य केलें आहे त्याकडे पाहिलें तर—कोणाचा त्यांच्याशीं कितीहि राजकीय मतभेद असो—महाराष्ट्रांतील बहुसंख्य हिंदुत्वाभिमानी समाज त्यांच्या पाठीशीं आहे हें आपल्याला नाकारतां येणार नाहीं. तिसऱ्या आसनावर अच्युतराव पटवर्धन विराजमान झालेले आपणांस आढळून येईल. १९४२ च्या चळवळींत भूमिगत राहून सबंध महाराष्ट्र जागृत करण्याचें जें प्रचंड कार्य त्यानीं केलें आहे त्याबद्दल महाराष्ट्र त्यांचा सदैव ऋणी राहील. चतुर्थासनावर बसण्याचा मान प्रा. दिनकर बळवंत देवधर यांचा आहे. क्रिकेटमध्यें, वयाची पन्नाशी ओलांडली तरी, तेवढ्याच तडफेनें खेळणारा वीर असाच त्यांचा गौरव करावा लागेल. प्रा. देवधरांच्या शेजारच्या आसनावर रंगभूमीच्या गळ्यांतील ताईत श्री. नारायण श्रीपाद राजहंस आपल्या प्रशांत मुद्रेनें बसलेले दिसतील. त्यांच्या नंतरचें आसन हिंदुस्थानचे श्रेष्ठ दिग्दर्शक श्री. शांतारामबापू यांनीं भूषविलें आहे. आणि सातव्या आसनावर अधिष्ठित होण्यास एकच लायक व्यक्ति उरली आहे. ती म्हणजे 'पंचेचाळीस हजार प्रतींच्या तीन मासिकांचे गुप्त सूत्रधार' श्री. शंकरराव किर्लोस्कर हे होत.

शंकरराव किर्लोस्करांवर लिहिण्याचें मीं योजिलें तेव्हांपासून त्यांच्यावर तीन वर्षांपूर्वी ओढवलेल्या दुःखद प्रसंगाची आठवण मला वारंवार होत आहे. त्यांच्या द्वितीय पत्नी सौ. आनंदीबाई किर्लोस्कर यांच्या निधनामुळें त्यांच्या सांसारिक आणि व्यावसायिक जीवनांतील एक निकटचा सहकारी

त्याना सोडून गेला आहे. आनंदीबाईच्या मृत्यूमुळें मराठी वाचकवर्ग एका नामवंत साहित्यिकेला मुकला आहे, हें आपल्याला कबूल करावें लागेल. आनंदीबाईच्या लघुकथांतुन दिसून येणारी स्त्रियांची असहायता स्त्रियांच्या वास्तवसृष्टीचें जणूं प्रतिबिंबच होती. आनदीबाईच्यां स्मृतिचित्रावर ही पुष्पमाला वाहून मी आज हातीं घेतलेल्या कार्यास आरंभ करतों.

शंकरराव किर्लोस्करांच्या नांवाचा परिचय त्यांच्या मासिकांच्या द्वारें हजारों लोकांना झाला आहे. पण मला वाटतें फारच थोड्या लोकांनीं त्याना प्रत्यक्ष बघितलें असेल. प्रत्येक समारंभास हजर राहून कांहींतरी लुडबुड करून स्वतःचें प्रदर्शन करण्याची त्यांना बिलकूल आवड नाहीं. किर्लोस्कराच्या उंच आकृतीकडे पाहिलें कीं त्यांच्या बौद्धिक उंचीची कल्पना आपल्याला येते. त्याच्या दृष्टींत दोष असल्यामुळें ते जरी चष्मा लावीत असले तरी त्यांचा समाजाकडे पाहण्याचा दृष्टिकोन व्यापकच आहे. हाडकुळ्या शरीरयष्टीमुळें या गृहस्थाची मनोवृत्तीही संकुचित असेल अशी जर कोणीं अटकळ बांधली तर ती साफ चुकीची ठरेल! शंकररावांचें आणि आळसाचें सख्य बॅ. सावरकर आणि बॅ. जिना यांच्या सख्याइतकें आहे, असें मीं म्हटलें तर आपल्या खास लक्षांत येईल मला काय म्हणायचें आहे तें !

हॅम्लेटनें आपल्या वडिलांसंबंधीं असे उद्गार काढले आहेत कीं, ‘He was a man, take him for all in all!’ शंकररावांसंबंधीं मीं हे उद्गार काढले तर त्यांत काय वावगें होईल?

आपल्या मासिकासाठीं नामांकित तसेंच उदयोन्मुख लेखक-लेखिकांचें साहाय्य मिळवायचें– लेखाच्या सजावटीसाठीं जातीनें लक्ष पुरवायचें, आणि किर्लोस्करवाडीस आलेल्या पाहुण्यांच्या सरबराईत कोणत्याही प्रकारचें न्यून राहूं द्यायचें नाहीं— आणि अशा तऱ्हेनें प्रगतीचा पुढचा टप्पा गांठायचा हा शंकररावांचा जीवनक्रम बनलेला आहे. ते स्वतः उत्तम चित्रकार आहेत, आणि त्यांनीं चित्रकलेचीच उपासना करण्याचें व्रत आचरलें असतें तर त्या व्रताची सांगता आज बाबूराव पेंटरांच्या शेजारीं बसण्याइतकी

झाली असती. परंतु स्वतःच्या मासिकाच्या प्रगतीकडे लक्ष देऊन चित्र-कलेची मनमुराद सेवा करण्याइतका वेळ त्याना मिळत नाहीं. आणि म्हणूनच चित्रकार म्हणून नांव मिळविण्याची महत्त्वाकांक्षा त्यांना आंतल्या आंत दडपून ठेवावी लागत आहे. त्यांनीं व्यंग चित्रांच्या बाबतींत यश संपादिलें असल्याच्या जिवंत पुरावा म्हणजेच ' टाकांच्या फेंकी ' हा व्यंग–चित्र संग्रह होय.

१९१६ सालीं स्थापन होऊन १९२० सालीं जोमानें सुरू झालेल्या किर्लोस्कर कारखान्यांतच हितचिंतकांस कारखान्याची चाललेली प्रगती वारंवार समजत जावी या आद्य हेतूनेंच शंकरराव किर्लोस्करांनीं ' किर्लोस्कर –खबर ' या नावाचें एक मासिक सुरू केलें, परंतु आज किर्लोस्कर–स्त्री–मनोहर या मासिकांचें लोण जगांत जेथें जेथें मराठी भाषा बोलली जाते तेथें तेथें जाऊन पोंचलें आहे, हें पाहून त्यांच्या प्रचंड कार्याचें कौतुक करण्याचा मोह आवरतां येणें अशक्य आहे. ' किर्लोस्कर खबर ' या नांवानें सुरू केलेलें हें मासिक जेव्हां बॅ. सावरकर यांच्या पाहण्यांत आलें– आणि शंकरराव किर्लोस्करांनीं जेव्हां त्यांना मासिकाला लेखन-सहाय्य करण्याची विनंती केली तेव्हां बॅ. सावरकर यांनीं शंकररावांना स्पष्ट लिहिलें— " किर्लोस्कर-खबर या नांवांतील खबर हा यावनी शब्द जर आपण काढून टाकीत असाल तर मी आपणांस अवश्य लेखन-सहाय्य करीन. " शंकररावांना बॅ. सावरकरांचा हा युक्तिवाद पटला. आणि त्यांनीं यानंतर ' किर्लोस्कर खबर ' यांतील ' खबर ' या शब्दाचें उच्चाटन करून ' किर्लोस्कर ' हें सुटसुटीत नांव आपल्या मासिकाला दिलें. ' किर्लोस्कर ' जसजसा मोठा होऊं लागला आणि जेव्हां तो वयांत आला तेव्हां त्याला एक जोडीदार आणून देण्याचा विचार शंकररावांच्या डोक्यांत घोळूं लागला. आणि म्हणूनच ' स्त्री ' निर्माण करण्यांत आली ! आणि सृष्टिनियमानुसार लवकरच दोघांच्या कार्याचें फळ म्हणजेच ' मनोहर 'चा जन्म झाला. किर्लोस्कर– स्त्री– मनोहर हीं मासिकें म्हणजे एक लहानसें कुटुंब वाटतें, त यामुळेंच ! किर्लोस्करांचा ' मनोहर ' मात्र येवढीं वर्षे झालीं तरी अजूनही छोटाच राहिला आहे. हें कां तें मात्र कळत नाहीं !

मराठींतील ‘ विविध-ज्ञान-विस्तार ’– ‘ करमणूक ’– ‘ मनोरंजन ’– ‘ रत्नाकर ’– ‘ सह्याद्रि ’ यांच्या मालिकेंत साजून आणि शोभून दिसतील अशींच किर्लोस्कर– स्त्री– आणि मनोहर हीं मासिकें आहेत. याहीपेक्षा अधिक म्हणजे ‘ विविध-ज्ञान-विस्तार ’मधील उच्च भूमिकेवरून लिहिलेल्या शास्त्रीय आणि समाजविषयक लेखांप्रमाणेंच शास्त्रीय आणि सामाजिक लेख तर यांत येतातच. शिवाय, त्याचबरोबर ‘ रत्नाकरांतील ’ मनोरंजक लघुकथा आणि लघुनिबंध याच्या प्रमाणेच लघुकथा आणि लघुनिबंध याही किर्लोस्करत्रयीमध्यें वाचण्यास मिळतात. किर्लोस्करांचीं मासिकें लोकप्रिय होण्यास माझ्या माहितीप्रमाणें पांच कारणें आहेत. हीं मासिकें वेळच्या वेळीं प्रसिद्ध होतात हें कारण पहिलें ! दुसरें कारण, या मासिकांकडे जे लेख प्रसिद्धीसाठीं येतात त्याची पोंच त्या त्या लेखकाना वेळेवर दिली जाते. तिसरें कारण, यातील लेखकाना त्याच्या श्रमाचें चीज म्हणून अल्पस्वल्प मोबदला दिला जातो. चौथें कारण लेखाची सजावट आकर्षक करण्यासाठीं शंकरराव जातीनें खटपट करतात आणि पाचवें कारण म्हणजे हीं मासिकें जिवंतपणानें जगत आहेत ! या पाची गोष्टी आज अनेक वर्षे सृष्टिनियमांप्रमाणें पाळल्या जातात याला सर्वस्वी कारण शंकररावच आहेत हें विसरून कसें चालेल !

किर्लोस्कर, स्त्री आणि मनोहर या मासिकांच्या आरंभीं प्रस्तावनेदाखल जीं स्फुटें लिहिलेलीं असतात आणि त्याच्या खालीं शंकररावांच्या सहीचा जो ब्लॉक छापलेला असतो त्या सहीची सहीसही नक्कल करण्याचा इतर संपादकानीं चालवलेला उपक्रम वाचकाना पाहणें असह्य होत आहे. शंकररावाच्या स्वाक्षरींतील डौलदारपणा पाहून त्याच्या व्यक्तिमत्वाचें त्यात प्रतिबिंब पडल्याचें आपल्या दृष्टीस पडतें. ‘ स्वाक्षरीनें माणसाच्या अंतः-करणाची ओळख पटते ’ या सुभाषिताचें प्रत्यंतर शं. वा. कि. च्या स्वाक्षरीत पुरेपूर दिसून येतें.

किर्लोस्कर मासिकानें बुवाबाजीवर बराचसा प्रकाश पाडून उपासनी-बाबाचीं व केडगावच्या नारायणमहाराजाचीं जीं गौप्यस्फोटें प्रसिद्ध केलीं, त्यानीं महाराष्ट्रात पसरलेल्या बुवाबाजीला बराचसा आळा बसला. वाङ्मयातील व बोलपटांतील प्रणयप्रसंगाला ‘ अश्लील ! अश्लील ’ म्हणून नाक

मुरडणारा पुण्यांतील एक भोंदू अश्लीलमार्तंड मोठ्या हौसेनें उपासनी-बाबांच्या मठींतील नग्नविहार जिभल्या चाटीत पाहात असल्याचें मला ठाऊक आहे. त्याचप्रमाणें या बुवाबाजीच्या भजनीं लागून पुण्यातील एका विद्वान डॉक्टरनें कर्जाचा केवढा डोंगर करून ठेवला आहे हेंही मला माहीत आहे. स्वतःस गुरुमाउली म्हणवून भेणाऱ्या व भोळ्याभाबड्या स्त्रियांना स्वतःच्या भजनीं लावून त्यांना ग्राम्य मार्गास परावृत्त करणाऱ्या या बुवारूपी सर्पांना त्यांच्या भक्तांच्या शिव्याशापांना न भिता ठेंचून काढलें पाहिजे आणि तसा प्रयत्न किर्लोस्कर मासिकानें केला याला कारण स्वतः शंकरराव किर्लोस्कर हे बुद्धिप्रामाण्यवादी आहेत हेंच होय.

बुवाबाजी-विध्वंसक चळवळीस जसें किर्लोस्करांना यश आलें, तसेंच अस्पृश्यता निवारण करण्याच्या चळवळीला सुद्धां किर्लोस्करांनींच प्रामुख्यानें हातभार लावल्यामुळें यश मिळालें आहे.

या प्रसंगीं मला पुण्यांत कांहीं वर्षांपूर्वी घडलेल्या एका मनोरंजक गोष्टीची साहजिकच आठवण होत आहे. पुण्यांतील एका सरदारानें आपली सरदारकी टिकवण्याकरितां एका बड्या सरकारी युरोपियन अधिकाऱ्याला मेजवानीचें आमंत्रण दिलें. एवढेंच नव्हे तर, मेजवानीनंतर हे सरदार त्या साहेबमज-कुरांना आपल्या स्वतःच्या शंकराच्या देवळात घेऊन गेले. या प्रसंगानंतर कांहीं दिवसांनीं पुण्यांत अस्पृश्यता-निवारण चळवळीचा एक आठव-ड्याचा कार्यक्रम होता. अस्पृश्यांना मंदिरप्रवेश मिळावा अशी मागणी करणें हें या कार्यक्रमाचें प्राथमिक ध्येय होतें. म्हणून उपरिनिर्दिष्ट सरदारांकडे कांहीं सुधारणावादी मंडळी गेली व त्यांना या चळवळीचें पुढारीपद स्वीकारा अशी त्यांनीं विनंती केली. युरोपियनाला देवळांत बेधडक घेऊन जाणाऱ्या या सरदारानें हें ऐकतांच 'अब्रह्मण्य'; 'अब्रह्मण्य' असें पुटपुटून आपलें डोकें एकशेंऐंशीं डिग्रींच्या कोनांतून त्रिवार हालवून त्या सुधारणावादी लोकांना वाटेला लावलें! अशा ढोंगी लोकांच्या विरोधाला न जुमानतां जी चळवळ सुरू झाली, तिला पोषक म्हणून शंकरराव किर्लोस्करांनीं आपल्या मासिकांतून अस्पृश्योद्धारावर लेख मागवून ते प्रसिद्ध केले. या चळवळींप्रमाणेंच त्यांनीं 'किर्लोस्कर' आणि 'स्त्री' या मासिकांतून

स्त्रियांच्या हलाखीच्या स्थितीचीं गाऱ्हाणीं समाजाच्या वेशीवर टांगलीं, आणि स्त्रियांना पुरुषाच्या बरोबरीनें हक्क मिळाले पाहिजेत अशी जोरदार मागणी केली. त्याचप्रमाणें निरनिराळ्या धंद्यातील, अनेक कलाक्षेत्रातील— नावारूपास आलेल्या सर्व पुरुषांचीं चरित्रें छापून तरुणतरुणींच्या मनांत त्या त्या प्रकारच्या व्यवसायांत पडण्याबद्दलचा उत्साह शंकररावांनींच निर्माण केला.— म्हणजेच त्यांनीं औद्योगिक प्रगतीकडे जनतेचें लक्ष वेधलें !

किर्लोस्करानीं अनेक नामवंत लेखकांचें लेखन सहाय्य आपल्या मासिकांकरिता मिळालें. इतकेंच नव्हे तर, सर्कशींतील रिंगमास्तर, सिंह— घोडा— शेळी— वाघ— हत्ती या भिन्न जातीय प्राण्यांकडून ज्याप्रमाणें आपल्याला हवीं असलेलीं, प्रेक्षकाना आवडतील अशा प्रकारचीं कामें, मोठ्या चातुर्यानें करवून घेतो, अगदीं त्याचप्रमाणें शंकरराव किर्लोस्करांनीं भिन्न मताच्या आणि भिन्न पक्षीय साहित्यिकाकडून आपल्याला हवें असलेलें आणि वाचकानाही आवडेल असें लिखाण लिहवून घेतलें. यावेळीं सहज आठवलें म्हणून किर्लोस्कराचें अंतःकरण किती मनमोकळें आणि उदार आहे, याचें एकच उदाहरण सांगतों. त्यांच्या ' स्त्री ' मासिकांतील ' स्वयंपाकघरातील गोष्टी ' या सदरांत येणाऱ्या खाद्यपदार्थांची श्री. य. गो. जोशी यांनीं ' फोलपटाचा चिवडा ' ही गोष्ट लिहून टिंगल केली होती ! परंतु शंकररावानीं ही गोष्ट मनात न ठेवता किंवा या गोष्टीचा मनांत ' डूख ' न धरता य. गो. जोशाच्या लघुकथाही आपल्या मासिकातून छापल्या. मात्र य. गो. जोशांनीं एका सिनेमा कंपनीच्या मालकानें देवाण-घेवाणींत त्यांचा अपमान केला अशी कल्पना करून स्वतःच्या मनांत अजून त्याच्याबद्दल अढी बाळगली आहे; व कित्येक वेळा त्या सिनेमा कंपनीच्या मालकावर उपरोधात्मक गोष्टी लिहून ते अजूनही आपला राग टिकवून आहेत. जोशीबुवा, शंकररावांसारखें उदार अंतःकरण ठेवण्यानेंच माणसाची प्रगती होते, डोक्यांत राख घालून होत नाहीं, हें मीं आपणांस सांगावें काय !

किर्लोस्करांच्या मासिकांतून प्रसिद्ध झालेली ' गोविंदराव टेंबे ' यांची ' माझा संगीत व्यासंग ' ही लेखमाला, अनंत काणेकर याचें ' धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ' हें प्रवासवर्णन, प्रो. फडके यांची ' माझी आत्मशवाणी '

असले विविध विषयांवरील लेख शंकररावांनींच प्रसिद्ध केले आहेत हें आपल्या कायम स्मरणांत राहील.

शंकरराव किर्लोस्करांचीं तिन्ही मासिकें उच्च ध्येयाच्या अनुरोधानें मार्ग आक्रमीत आहेत. या मासिकांनीं वाचकांपुढें नवेनवे विचार मांडून समाज बुद्धिप्रामाण्यवादी व्हावा अशी खटपट केली आहे. आणि विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, या मासिकांनीं जुन्या मतांची टिंगल अशी कधींच केली नाहीं, तर जुन्या धार्मिक रूढींच्या मगरमिठींत अडकलेल्या समाजाला त्या रूढींतील दुष्ट चालीरीति कां सोडून द्याव्यात हें सशास्त्र दाखविलें, आणि त्याचबरोबर नवमतवादी धोरणाचा सोदाहरण पुरस्कार केला.

शं. वा. कि. हे कांहीं स्वतः मोठे पदवीधर नाहींत किंवा अमुक विषयात आपण पंडित आहों असें कधींच त्यांनीं भासविलें नाहीं. आणि तरीहि त्यांना जो मोठेपणा प्राप्त झाला आहे, त्याला त्यांचें समाज सुधारणेचें कार्य आणि वाचकवर्गाशीं त्यांनीं ठेवलेलें घरोब्याचें नातें, हीं बहुतांशीं कारणीभूत आहेत. मी त्यांच्या मासिकांना या प्रसंगाच्या निमित्तानें भरभराट चिंतितों !

# ८ : आलमगीर

दर रविवारीं सकाळीं मी सात वाजतां उठतों. सकाळचा सर्व कार्यक्रम उरकल्यानंतर वर्तमानपत्रवाल्यानें टेबलावर टाकलेलें 'विविधवृत्त' वाचायला घेतों. आणि मी वाचायला सुरवात करणार इतक्यांत, आमच्या शेजारचे धोंडोपंत डाव्या हातांत धोतराचा सोगा आणि उजव्या हाताच्या बोटानें दांत घांसत, खोलींत प्रवेश करून विचारतात--

"काय गोविंदराव ? आलमगीर काय म्हणतोय ?"

* * *

मराठी वाङ्मयांत आजपर्यंत बऱ्याच लेखकांनीं टोपणनांवें घेऊन विविध विषयांवर टीकालेख- लघुकथा- काव्य- आणि कादंबऱ्या वगैरे वाङ्मय निर्माण केलें आहे. टोपणनांव घेऊन लिखाण करण्यांत एक फायदा असा असतो कीं, टीकाकारानें कितीहि कडक आणि कडवट टीका केली, तरी फार-तर त्याच्यावर शब्दांचाच मारा होईल; व्यक्ति कोण हें माहित नसल्यामुळें पादत्राणांचा मारा तरी चुकेल ! टोपणनांव घेऊन लिहिण्यांत एका प्रकारचा कमीपणा- स्पष्ट म्हणतों, माफ करा- क्लीबत्व दिसून येतें. परंतु एकादा बिन-नांवाजलेला लेखक जेव्हां राजकारणावर आणि समाजकारणावर लिहूं लागतो तेव्हां त्याच्या खऱ्या नांवापेक्षां त्याचें टोपणनांवच त्याच्या लिखाणाकडे वाचकांचें जास्त लक्ष वेधतें. पाश्चात्त्य वाङ्मयांत 'जुनिअस' हें टोपणनांव घेऊन विषारी टीकालेख लिहिणारा लेखक जसा आढळतो, त्याचप्रमाणें 'जॉर्ज इलियट' हें पुरुषी टोपणनाव घेऊन कथा लिहिणारी लेखिकाही सांपडते. आपल्या मराठी वाङ्मयांत 'धनुर्धारी'पासून 'शिखंडी'पर्यंत टोपणनांवाच्या व्यक्ती सांपडतातच. आजपर्यंतच्या अनेक टोपणनांवांत दोनच नांवें प्रामुख्यानें गाजलीं. पहिलें नाव आलमगीराचें ! आणि दुसरें विभावरी शिरूरकरांचें ! एक बुवा आणि दुसरी बाई ! !

आलमगीरावर लिहायचें मी योजिताच वैचारिक ग्रहणानें मला कांहीं वेळ ग्रासलें ! महाभारतातील चक्रव्युहासबंधींचा अध्याय माझ्या दृष्टीसमोर वारंवार येऊं लागला. कौरवांनीं कौटिल्यानें रचलेल्या चक्रव्यूहात बाळ अभिमन्यूनें प्रवेश करण्याचा धाडसी निर्धार केला, तेव्हां कौरवांकडील आजूबाजूचे वृद्ध आणि तरुण सैनिक म्हणूं लागले—" काय वेडा पोर आहे ! मागचा-पुढचा विचार न करतां धाडस करतो आहे ! धाडस कसलं, निव्वळ आतताईपणा आहे हा !—" अगदीं तद्वतच मी आलमगीराच्या चक्रव्यूहांत प्रवेश करतांना पाहून मराठी वाङ्मयांतील जुने आणि जाणते साहित्यिक माझ्याकडे ' काणा-डोळा ' करून म्हणतील कीं, " काय खुळा आहे हा लेखक ! ज्याच्या नांवावर अजून एक पुस्तक सुद्धां प्रकाशित झालें नाहीं, त्यानें अनेक वर्षं ' विविध-वृत्ताच्या झरोक्यातून ' सतत लिहिणाऱ्या आलमगीरावर लिहायला धजावें ! हद्द झाली आतां याच्यापुढें ! " कळतें आहे मला काय म्हणतील तें ! परंतु मला जें मनापासून वाटतें, माझी मनोदेवता मला जे ' लिही लिही ' म्हणून बजावत आहे, त्याला स्मरून माझें कर्तव्य मी करणारच. आलमगीरावर लिहितांना मला एक गोष्ट प्रथम सांगितली पाहिजे ती ही कीं आलमगीर ह्या टोपणनांवाचा बुरखा घेऊन जे गृहस्थ लिहितात, त्यांच्या विद्वत्तेबद्दल मला आदर आहे; त्यांच्या चतुरस्र लेखणीचें मी कौतुक करीन, त्यांच्या अतुल त्यागाबद्दल मी माझी मान लीनतेनें लववीन ! मला खुद्द त्यांच्यासंबंधीं अवाक्षरही काढायचें नाहीं ! माझा विशेष लिहिण्याचा रोख आहे तो ते ' आलमगीर ' या यावनी टोपणनावानें लिहावयास बसतात त्या भूमिकेवर ! आलमगीर ही व्यक्ति कोण आहे हें मला माहीत असूनही वृत्तपत्राच्या अलिखित आणि प्रतिष्ठित नियमांनी मी बद्ध झालेला असल्यामुळें मला त्याची वाच्यता या ठिकाणीं करतां येणें अशक्य आहे. माझा त्याला नाइलाज आहे.

या प्रास्ताविक नमनानंतर, आतां मला आलमगीरांच्या आख्यानाकडे वळावें लागणार आहे. प्रथम मी मला आठवलेल्या हितोपदेशांतील एका श्लोकानें माझ्या आख्यानास आरंभ करतों. " नरः सर्षपमात्राणि परच्छिद्राणि पश्यति ॥ आत्मनो बिल्वमात्राणि पश्यन्नपि न पश्यति ॥ "

बेजबाबदार टीकाकाराला सर्वथैव साजेल असेंच हें वर्णन आहे. बेजबाबदार टीकाकाराला मोहरीएवढा दोष जरी दुसऱ्यांत आढळला तरी त्याचा उल्लेख तो करतो. आणि स्वतःच्या ठिकाणीं बेलफळाएवढा दोष जरी असला तरी तिकडे दुर्लक्ष होतें. सारस्वताची चिकित्सा करण्याची, समाज-कारणाचें विवेचन करण्याची, आणि राजकारणाचें मूल्यमापन करण्याची जरी थोडीशी दृष्टि आणि सामर्थ्य वाचकास प्राप्त झालें, तरी अल्पावकाशांत त्याचें टीका-कारांत रूपांतर होतें; टीकाकाराचा आव त्याचक्षणीं आव्हानाचा बनतो. तो लागलीच एकाद्या झब्बूशाहीचा हस्तक होतो. निव्वळ दोषदर्शन ही खरी टीका नसून तिला 'द्वेषमूलक' हेंच नांव सार्थ ठरेल. गुण-दोष-विवेचन हा टीकेचा पाया असावा आणि तिचा गाभा पक्षातीत असावा, असें मी तरी म्हणेन. टोपणनांव घेऊन टीका करण्यांत काहीं पाप आहे असें नाहीं मी म्हणत. पण तशी टीका प्रायः व्यक्तिद्वेषानें आणि सूडबुद्धीनें प्रेरित झालेली असते. अशा टीकेला 'एकांगी' हेंच नाव शोभून दिसेल. स्वतःच्या मताप्रमाणें वागणें हें कदाचित् समाजाच्या विरुद्ध असेल; पण अशा तऱ्हेनें आचरण करणाऱ्यांवर टीका कां व्हावी ? बऱ्याच स्त्री-पुरुषांनीं पुरोगामी विचार पटतात म्हणून समाजाविरुद्ध बंडखोरी केली तर ती काय अनीती झाली ? उलट, "बोले तैसा चाले । त्याचीं वंदावीं पाऊलें ॥" या समर्थांच्या उक्तीनुसार आपण न वागता समर्थांच्या श्वानाप्रमाणें आपण भुंकत का सुटावें ? 'शस्त्रक्रिया म्हणजे जसें क्रौर्य नव्हे तसें टीका म्हणजे टवाळी नव्हे,' हें रा. गजाननराव माड-खोलकरांचें विधान मला पटतें. गांधी हे शामळू आहेत, म्हणून ते अहिंसेचें स्तोम माजवतात असें म्हणणें निषेधार्ह नाहीं का ? शंकरराव देवांच्या दाढीची आलमगिरानें टिंगल केली. देवांच्या दाढीच्या केसानें आलमागिराचा कधीं गळा कापला आहे का ? याहीपुढें जाऊन टीकाकार जेव्हां त्या व्यक्तीच्या व्यंगांचा उल्लेख करतो, तेव्हां त्याच्यापुढें हद्द होते. भाऊसाहेब खांडेकरांवर टीका करताना त्यांच्या कोडाचा का उल्लेख केला जातो हें एक कोडेंच नाहीं का ? श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांवर लिहिताना त्यांच्या अर्धांग-वायूची उपपत्ती शोधण्यांत यांचा काय हेतू ? परंतु अशा प्रकारची टीका वाचण्यांत आजकालचे वाचक रंगून जातात, आणि म्हणूनच कांहीं टीका-

कार लोकांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढतात. व्यक्तिविषयक टीकाहि कांहीं वेळां समर्थनीय ठरते. पण ती मुद्देसूद असावी. ‘ गवयाचा आवाज गोड नाहीं. ’ असें म्हणण्यांत व्यक्तिविषयक टीका होत नाहीं, तर ‘ त्यानें कुठें शेण खाल्लें ’ हें दाखविण्यांत ती जरूर होते. अमक्याचें लिहिणें पटलें नाहीं—पसंत पडलें नाहीं, तर ‘ त्याचा हात कलम केला पाहिजे ’ असें म्हणा. पण ‘ तमुक बाईच्या हातांत हात घालून तो फिरावयास जातो म्हणून त्याच्या हातून अशी टीका झाली— ’ हें सुचविण्यांत व्यक्ति-विषयक कुचाळी नाहीं का झाली ? अमुक कवीच्या वरच्या ओठांवर मिशाचें जाळें नसल्यामुळें तो वीररसाचें काव्य करण्यास नालायक आहे, असें म्हणा. परंतु ‘ वीर ’ शब्दावर ग्राम्य कोटी करून त्याला ‘ तिसऱ्या’ प्रकारच्या माणसांत ढकलणें व्यक्तिविषयक टवाळी नाहीं का होणार ? ‘ या इसमाजवळ गुप्त असं कांहीं राहात नाहीं ’ असें म्हणण्याऐवजीं ‘ तो जिथं तिथं ओकतो ’ ही गलिच्छ टीका नाहीं का होत ?

आलमगिरानें आजपर्यंत अनेक साहित्यिकांवर, सामाजिक कार्यकर्त्यांवर आणि राजकीय पुढाऱ्यांवर आपल्या टीकेच्या सड्याचे शिंतोडे उडवले आहेत. आणि याच्या उलट त्यानें उल्लेखनीय आणि गौरवणीय कृतीहि केल्या आहेत. त्यांचा यथोचित गुणगौरव मी यथावकाश करणारच आहें. आलमगिराचें सर्व लिखाण मूल्यमापनाच्या तराजूंत तोललें तर योग्य टीकेचें पारडें अस्थानीं टीकेच्या पारड्याइतकेंच जड असलेलें आढळून येईल. आणि म्हणूनच मी अस्थानी टीकेच्या पारड्याचा प्रथम समाचार घेणार आहें.

आलमगीरानें गांधींच्या राजकारणावर, गांधींच्या सत्याग्रह आणि अहिंसा या उच्च तत्त्वांवर, गांधींनीं वेळोवेळीं केलेल्या उपोषणांवर आणि गांधींनीं आडपडदा न ठेवतां एका शिष्येला दिलेल्या प्रसाददीक्षेवर जें तोंडसुख घेतलें आहे, त्याला मराठी वाङ्मयांत तरी तोड नाहीं. गांधींच्या म्हणजेच पर्यायानें कॉंग्रेसच्या राजकारणाशीं ज्यानें केव्हांच मिळतें घेतलें नाहीं— ज्याचें केव्हांच जमलें नाहीं— असा वृत्तपत्रसृष्टींत आलमगीर हा एकच आसामी आहे. गांधींच्या राजकारणाची गाडी चुकीच्या रूळांवरून गेल्या-मुळें तिला स्वराज्याचें स्टेशन गाठण्यास थोडा अधिक कालावधि लागेल.

पण मग त्याच्या चुकीच्याच राजकारणाची चर्चा करा. गांधींच्या राजकारणावर लिहितांना गांधींच्या शेळीशीं लाडेलगट करून तिच्याशीं बळजबरीनें चुंबाचुंबी करण्याची अलमगीरला काय गरज ? गांधी खजूर खातात म्हणून यानें कां दांतओंठ खावे ? त्या महात्म्याच्या उपोषणानीं निर्माण झालेल्या प्रत्येक गंभीर प्रसंगीं आलमगिरानें पोट भरभरून दिलेल्या विडंबनात्मक करपट ढेकरा ऐकून, महात्म्याचा उत्कर्ष पाहून याच्या पोटांत दुखूं लागलें असावें असेंच नाहीं का कोणी म्हणणार ? गांधींसारखे थोर पुढारी आलमगिराच्या लिखाणाविरुद्ध दाद मागायला सरकारी न्यायालयांत जात नाहींत हें ओळखूनच आलमगीराला दुप्पट चेव येतो.

टीकाकाराच्या अडणीवर बसून शंकरराव देवांच्या नावानें नेहमीं 'शंखराव' असा शंखध्वनि करण्यांत आलमगीर बारा महिने फाल्गुनमास साजरा करीत नाहीं का ? प्रो. माटे यांचा उल्लेख पूर्वी 'माटे मास्तर' असा वारंवार करून त्यांना खिजवण्यांत आपल्या वाचकांना आलमगिरानें काय शिकवण दिली ? भालाकार भोपटकर यांनीं भाल्यांतून वर्णिलेला लवंडा द्रोण टाकून बसक्या वाटींतून टीकेच्या शाईनें बरबटलेली बासुंदी आलमगिरानें कां ओरपली ? प्रो. अप्पासाहेब फडके यांनीं आलमगिराविरुद्ध ब्रही काढला नसताना त्याच्याविरुद्ध टीकेच्या मर्यादा ओलांडून आलमगिरानें त्यांची 'कलंकशोभा' का करावी ? नरसोपंत केळकर हे पगडी घालतात हें पाहून कालानुसार आपली चांद टोपी फिरविणाऱ्या आलमगिराचें डोकें का उठावें ! नरसोपंतांनीं भुइमुगाचे दाणे खाल्ले म्हणून आलमगिराचें पित्त भडकायला काय झालें ? वरेरकर मामांच्या पायगुणाची चर्चा करून त्यांना टांग मारण्यांत आलमगिराने काय मिळवलें ? 'महाराष्ट्राकडे वक्रदृष्टीनें पहाणारा शनि ' अशी वल्लभभाई पटेलांसारख्या एका कट्टर देशभक्ताची नालस्ती करून आलमगिरानें त्याच्या राशीस कां लागावें ? कन्हयालाल मुनशींवर टीका करण्याचें खुनशी धोरण वारंवार पत्करून आलमगिरानें गुजराथी आणि दाक्षिणी या तेढीच्या फोफावणाऱ्या वृक्षाला आपल्या टीकेचें खतच नाहीं का घातलें ? अण्णासाहेब लठ्ठे यांच्यासारख्या, माजी काँग्रेसमंत्रिमंडळांतील अर्थसचिवावर बिन बुडाचे आरोप करण्यांत

आलमगिरानें काय स्वार्थ साधला ? लोकमान्यांच्या केसरी-पत्राची मूषक-वृत्तीनें आलमगिरानें टिंगल कां करावी ! प्रागतिक पक्षाच्या घरट्यांत बसून वृत्ताच्या रकान्यांतून चिवचिव करणाऱ्या आलमगिरानें अपक्ष-परिषदेचे प्रागतिक पुढारी सर तेजबहादूर सप्रू यांची मधून मधून चेष्टा कां करावी ? कोल्हापूर–ग्वाल्हेर आणि इंदूर या संस्थानाच्या अंतस्थ राजकारणांत शिरण्याचें सोंग घेऊन संस्थानच्या गोषातील स्त्रियांवर आलमगिरानें बुरखा घेऊन कां हल्ला करावा ? गांधीजींचे व्याही राजाजी यांच्यासारख्या चतूर पुढाऱ्यांची ' डेप्युटी महात्मा ' म्हणून आलमगिरानें कां चेष्टा करावी ? सदोबा पाटील यांच्या पाठीमागें लागण्यात आलमगिरानें कोणती पाटीलकी पटकावली ! नरसोपंत केळकरांच्या राउंड-टेबल कॉन्फरन्समधील इंग्रजी भाषणाची आलमगिरानें टिंगल केली; पण स्वतः सुरू केलेलें Alamgir Calling हें सदर बंद करण्यांत आलमगिराची इंग्रजी माशी कोठें शिंकली ?

आलमगिराच्या अनिष्ट मजकुरासंबंधीची माझी पक्षातित चर्चा येथे संपत आहे. आलमगिरानें बऱ्याच वेळां उत्कृष्ट लिखाण केलें असून, अनेकवार धाडसाचे लेख लिहून सामाजिक व राजकीय बाबतींत कांहीं ठिकाणीं जी झब्बूशाही आपला धुडगूस घालीत आहे, तिचा यशस्वी गौप्यस्फोट केला आहे. मी दोषाबरोबर गुणांचेंही मूल्यमापन करणारा समीक्षक असल्यामुळें, वरील कारणासाठीं आलमगिराचा यथोचित गौरव करणें माझें कर्तव्य आहे, आणि त्याप्रमाणें मी तें आतां करणारही आहें.

आलमगिराच्या लिखाणाची बैठक जरी टीकाकाराची असली तरी त्याच्या लेखांतील भाषा ओघवती असते आणि कित्येक वेळां त्या भाषेवर कै. शिवरामपंत परांजपे यांच्या भाषेची छाप पडल्याचा प्रत्यय येतो. उपमा उत्प्रेक्षा– उपहास आणि व्याजोक्ति इत्यादि अलंकारांनीं सुशोभिलेली आलमगिराची भाषासुंदरी जेव्हा नादमधुर तालावर नाचूं लागते, तेव्हां वाचकांचे भान हरपून वाचक खरोखरच आलमगिराचें कौतुक करूं लागतो. आलमगिराच्या भाषेंत तिखटपणा व आव्हान असतें. ' आलमगीर ' या सदरावरच विविधवृत्ताचा खप अवलंबून आहे हे विविधवृत्ताचे कर्तबगार संपादक श्री. रामभाऊ तटणीस यांनाही मान्य करावें लागेल. इतकेंच

नव्हे, तर आलमगिराच्या सनसनाटी मजकुरामुळेंच विविधवृत्ताचा खप वीस पंचवीस हजारांपर्यंत गेला होता, हें पाहून आलमगिरासारख्या लेखकाची किंमत किती जबर आहे याची प्रतीति येते. आजवर निघालेल्या कोठल्याहि नियतकालिकांत अशा तऱ्हेचें तडफदार आणि आकर्षक 'फीचर' आलें नाहीं असें माझें स्पष्ट मत आहे. आलमगिरानें मिळविलेली माहिती बरेच वेळा विश्वसनीय असते आणि त्याच्या हातीं आलेल्या पुराव्याच्या भांडवलावर त्याला कोणाच्याहि नांवानें टीकेचा चेक वटवितां येतो. आलमगिरानें केलेल्या गौरवानें एकादी व्यक्ति— एखादा बोलपट— एखादें नाटक— अगर एकादें पुस्तक गाजल्याशिवाय राहात नाहीं. अगदीं तद्वतच त्यानें केलेल्या टीकेनें ती व्यक्ति— तो बोलपट— तें नाटक अगर तें पुस्तक सपशेल आपटल्याशिवाय राहात नाहीं.

कांहीं दिवसांपूर्वीं सर फेरोजखान नून यांनीं मेयोच्या सुरात स्वतःचा बदसूर मिळवून हिंदी लोकांची बदनामी करणारें जें एक चोपडें लिहिलें त्याचा योग्य समाचार आलमगिरानें घेतला. ही आलमगिराची कामगिरी अभिनंदनीय नाहीं काय? आलमगिरानें आठ वर्षांपूर्वीं 'लोकशक्ति-सर्क्यूलर' छापून जो गौप्यस्फोट केला आणि त्या वेळच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळांतील वशिलेबाजी चव्हाट्यावर आणली, त्या वेळची आलमगीराची भूमिका तर्कशुद्ध होती असें मला प्रामाणिकपणें वाटतें. कांहीं दिवसांपूर्वीं सिनेमा-क्षेत्रांत— व क्रिकेटक्षेत्रांत माजलेल्या महाराष्ट्रीय विरुद्ध गुजराथी या वादांत आलमगिरानें खरी असलेली महाराष्ट्राची घेतलेली बाजू पाहून आलमगीराच्या बाणेदारपणाची कल्पना येत नाहीं काय? आलमगीरानें महाराष्ट्रांत माजलेल्या बुवाबाजीविरुद्ध— अस्पृश्यतेविरुद्ध— फलज्योतिषशास्त्राविरुद्ध जेव्हां जेव्हां लिहिलें तेव्हां तेव्हां तें मला पटलें. एका वेश्येच्या घरीं सांपडलेल्या सरकारी फाइलींतून निघालेल्या मध्यप्रांताच्या राजकारणाची त्यानें केलेली चर्चा धाडसाचीच नव्हती काय? काशीबाई हणबरची न्याय्य बाजू उचलून घेऊन तिचा अन्याय सरकारच्या वेशीवर टांगण्यांत आलमगीरानें काय कमी कामगिरी केली? प्रतापसिंह महाराज गायकवाड यांनीं अष्टपुत्रा सौभाग्यवती हयात असतांना दुसऱ्याच एका बाईशीं केलेला विवाह किती निषेधार्ह आहे

ह्याचा आलमगिरानें केलेला पाठपुरावा प्रशंसनीय नाहीं काय ? काल-परवाच्या जातीय दंग्याची आलमगीरानें केलेली छाननी आणि त्यानें चव्हाट्यावर आणलेली कॉंग्रेस मंत्रिमंडळाची भित्री वृत्ति ही कामगिरी कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ?

आतां मला आलमगीराच्या स्थित्यंतराबद्दल लिहायचें आहे. आरंभीं आलमगीरानें केलेली नेमस्ताची तरफदारी, मध्यंतरीं, दाखवलेली स्वतंत्र वृत्ति, कांहीं दिवस चालवलेली सावरकर आणि हिंदुसभा प्रशस्ति— नंतरची समाजवादी विचारसरणी आणि अलिकडची पुनः स्वतंत्र वृत्ति पाहून आलमगीराच्या आजवरच्या बदलत्या आसनाचा चित्रपट माझ्या डोळ्यापुढून सर्रकन् सरकला ! आजच्या राजकीय भूमिकेनंतर आलमगीर कोणती भूमिका स्वीकारणार याचा कांहींच अंदाज करता येत नसल्यामुळें ' आलमगीर आपल्या पक्षाचा आहे ' असा डांगोरा पिटणाऱ्या लोकांना एक इषारा देणें मला भाग पडत आहे. फ्रान्सचा राजा चौदावा लुई याचा हुकूम घेऊन त्याचा सेनापती मार्शल व्हिलर्स जेव्हां सैन्यानिशीं रणांगणावर जायला निघाला, तेव्हां एका बाजूला नेऊन त्यानें लुईला सांगितलें— " खाविंद, आपल्याला शत्रूची फिकीर नको. रणांगणावर त्यांच्या पारिपत्याचं मी पाहून घेईन. आपण मात्र आपल्या मित्रांवर करडी नजर ठेवा. कारण ते आपल्याला केव्हां चकवतील याचा नेम नाहीं. "— आलमगीराला आपल्या पक्षाचा समजणाऱ्यांना मलाही सांगायचें आहे कीं,— " लोकहो, आपल्याला विरोधी पक्षाची भीती बाळगण्याचें कारण नाहीं. आपण मात्र आपला समजणाऱ्या आलमगीराला संभाळा. केव्हां काय होईल याचा नेम नाहीं. "

आलमगीराच्या अंगीं असलेल्या सर्व गुणांचा उपयोग जर विधायक कार्याकडे झाला असता तर ? स्वराज्याच्या रोखानें चाललेल्या कॉंग्रेसच्या राजकारणाच्या नौकेला विविध-वृत्ताच्या पाणबुडींतील आलमगीरानें जलतीर मारून नादुरुस्त केलें नसतें तर ? पण जाऊं दे ! होऊन गेलेल्या गोष्टीला काय इलाज ! आलमगीरानें आपली लेखणी निव्वळ सत्कारणींच लावली तर किती योग्य होईल. तो सुदिन लौकर उगवावा अशी परमेश्वराजवळ माझी हात जोडून प्रार्थना आहे. ' तथास्तु ' हा आशीर्वाद जगन्नियंत्याच्या मुखांतून ऐकण्यास मी अधीर झालों आहें. इत्यलम् !

# १ : कु. शांता आपटे

गेल्या एप्रिल महिन्यातील गोष्ट ! ईस्टरच्या सुट्टीचा फायदा घेऊन एका सिनेमा कंपनीच्या मालकाच्या खास आग्रहाच्या निमंत्रणावरून मी मुंबईस गेलो होतो. कंपनीच्या स्टुडिओंत माझी व मुंबईस नव्यानेंच सुरू व्हावयाच्या एका मराठी साप्ताहिकाच्या संपादकाची ओळख करून देण्यांत आली. त्यावेळीं मोठ्या उमेदीनें आणि अंतःकरणपूर्वक होकार दिला. आणि त्या प्रसंगातून सुटका करून घेतली. कांहीं दिवसांनंतर टेबलावरचा पत्रव्यवहार चाळीत असतां मला शॉक बसला, आणि 'बोलपटसृष्टींतील चांद्रिका' या लेखमालेंत शांता आपटे यांच्यावर लेख लिहिण्यासाठीं पहिला बळी माझा देण्याचें संपादकांनीं ठरविलेलें पाहातांच— सिनेमा सुरू होण्यापूर्वी होणाऱ्या अंधाराची चमकती चुणूक माझ्या डोळ्यापुढें आली ! कु. शांता आपटे आणि बाबुराव पटेल यांचा कांहीं वर्षांपूर्वी झालेला सामना मी विसरलों नव्हतों. जगजाहीर झालेल्या त्या प्रसंगाचा वचक आणि अशा गुणसुंदर नटीवर मीं लिहावयाचें म्हणजे, कोकिळेचा आवाज मधुर असतो ही गोष्ट दौंड स्टेशनवर भाजीपुरी विकणाऱ्या भय्याच्या आवाजांत सांगण्यासारखें आहे ! किंवा चौपाटीवर मखमली वाळूंत आपल्या मादक सौंदर्याची खैरात करणाऱ्या तरुणीचें वर्णन 'अन् हि' असल्या भिकार शब्दांची मदत घेऊन काव्यांत करण्यासारखें आहे ! उभ्या हिंदुस्थानला आपल्या गोड गाण्यानें—भिंगरीसारख्या गिरक्यांनीं—स्वतःभोंवतीं स्तुतिस्तोत्रांचें रिंगण घालावयास लावणाऱ्या चमकत्या—शांता आपटे यांच्या बद्दल मी आज लिहिणार आहे.

मी एकदां माझ्या जहागिरदार मित्राच्या घरीं त्याच्या लग्नानिमित्त त्याच्या निमंत्रणावरून प्रयोजनास गेलों होतों. पंक्तीत लावलेल्या

उदबत्त्यांचा सुवास मुलींच्या अंबाड्यावरील वेणीतील सुवासिक सुमनाच्या सुगंधासारखा चोहोंकडे दरवळत होता. पानांवर वाढलेल्या जिलबीच्या पक्वान्नाकडे पाहात पंक्तींतील गृहस्थ तिष्ठत बसले होते. एका बाजूला कांचनमाला शिरोडकर यांची 'नांव तिकडचं कसं घेऊं ग बाई?' ही रेकॉर्ड लावली होती. इतक्यांत अलंकारानें नखशिखांत नटलेली वधू गज-गतीनें पायांत घातलेल्या चाळ्याच्या कर्णमधुर ठेक्यावर लाजत, मुरकत, ठुमकत आणि 'मी नाहीं जा' अशा लटक्या रुसव्यांत जांवईबापूंच्या शेजारच्या आडव्या पाटावर येऊन स्थानापन्न झाली. बराच वेळ झाला तरी ती जिलबीचा घांस देईना मुळीं! तेव्हां पंक्तींतील हिरवेपणा अस-लेले एक वृद्ध गृहस्थ पुकारले— 'अहो द्या घांस! येवढं लाजायला काय झालं? नावांत काय आहे?' आणि जिकडे तिकडे हास्याचे फवारे उडाले!

इंग्लंडमध्यें जन्मलेल्या शेक्सपिअरनें एका ठिकाणीं म्हटलें आहे कीं, 'नांवांत काय आहे?' पण मी बेदिक्कत सांगतों कीं, तोच शेक्सपिअर आकाशांतील बापाच्या कृपेनें ह्या शतकांत हिंदुस्थानात जन्मला असता तर लोकांनीं त्याचा केव्हाच 'डॉ. खरे' करून टाकला असता!

अंधारांतील रुपेरी पडद्यावर चमकणाऱ्या तारकांच्या नांवांत काय लज्जत भरलेली आहे हें मानसशास्त्राच्या अभ्यासकालाच कळेल! प्रेक्षकांच्या आवडत्या तारकांच्या 'नांवासाठींच एकाद्या फडतुस चित्रपटालासुद्धां 'दे मार' गर्दी लोटते. रसिकांच्या आवडत्या अशा कांहीं सिने-चंद्रिका आहेत कीं, बोलपटाचें अर्धेअधिक यश त्यांत काम करणाऱ्या तारकांच्या नांवांवर अवलंबून असतें! कुणाला रागिणीच्या मोहकपणाचा उपासक व्हावेंसें वाटतें, तर कुणाला माधुरीच्या मादक सौंदर्याचा मजनू व्हावेसें वाटतें. पण एकाद्या तरण्याबांड तारकेच्या नांवानें ध्यास घेणाऱ्या धांधावलेल्या प्राण्याच्या हेंही लक्षांत येत नाहीं कीं, आपण ज्या नांवाचा ध्यास करीत आहों हें त्या तारकेचें खरें नांव नाहीं! बोलपटसृष्टींत प्रवेश करणाऱ्या मुली स्वतःच्या सोयीसाठीं आणि प्रेक्षकांच्या आवडीसाठीं बनावट नांवें धारण करतात!

त्यापैकींच शांता आपटे ह्या एक आहेत. ह्यांचें मूळचें नांव भीमा आहे, हें किती जणांस ठाऊक आहे बरें ?

कलावंत म्हणवणाऱ्या चित्रकारानें आम्यांत राहून शोकिन शहाजहाननें सौन्दर्याची 'ए-वन्' भासणाऱ्या मुमताजकरितां बांधलेला ताजमहाल न पाहणें— जितकें अशक्य ठरेल तितकेंच पुण्यांत एवढीं वर्षें राहिलेल्या माझ्या-सारख्या इसमानें शांता आपटे यांना न पाहणें असंभवनीय ठरेल ! ज्या वेळेस मी माझ्या व्यावसायिक कार्यानिमित्त परगांवीं जातों, त्यावेळीं पुण्याचे पाहुणे म्हणून माझ्याभोंवतीं मुलांचा आणि मुलींचा घोळका जमतो. कुणी विचारतो तो जिलब्या मारुति कोठें आहे ? कुणी सांगतो तुम्ही शनिवार-वाड्याच्या फुटक्या बुरुजाचें वर्णन करा ! एक ना अनेक प्रश्नाचा भडिमार माझेवर करतात. अशाच प्रश्नांचा मारा चालू असतांना 'शांता आपटे यांना तुम्हीं कधीं पाहिलें आहे का ? त्याचा व तुमचा परिचय आहे का ?' असाही प्रश्न विचारतात. पण खरें सांगूं. मला अशा प्रश्नांचीं उत्तरें देणें मनापासून आवडत नाहीं. पण त्यांनीं नाखूष होऊं नये आणि माझ्या पाहुणचारातहि कमतरता पडूं नये म्हणून मी त्यांना एवढेंच सांगतों कीं— 'पेरी कंपनीच्या पेपरमिंटासारखे गोड गाल' 'गरगरा फिरणाऱ्या तेजस्वी दिव्याप्रमाणें डोळे' 'उन्मादक सौन्दर्याप्रमाणें डोळ्यांत भरणारे बंडखोर दांत' असें कांहींसें शांता आपटे यांचें वर्णन करतां येईल. आणि एवढेंच नव्हे तर टीकाकारां-च्या फुरफुरण्याचे विषारी फूत्कार कानांवर येऊन उत्साहभंग होऊं नये आणि प्रशंसाकाराच्या प्रेमळ पाल्हाळानें कान विटून गर्वगोहर होऊं नये म्हणून त्या कानांवरून केंस घेत असाव्यात अशी माझी कवि-कल्पनाहि मी त्यांना सांगतों.

कांहीं वर्षांपूर्वी ही तारका तरुणांना 'इराणी रेस्टॉरॉंइतकी' तरुणींना 'प्रिंटेड पातळाइतकी', पेन्शनरांना 'पुण्याइतकी', आणि वृत्तपत्रांना 'सेन्सेशनल बातमीइतकी' प्रिय वाटत होती.— अशा या लोकप्रिय शांता आपटे यांचा जन्म सोलापूर जिल्ह्यांतील एका तालुक्याच्या ठिकाणीं झाला. या लहानग्या शांताच्या वडिलांना रोज रात्रीं एक-एक वाजेपर्यंत भजन करीत बसण्याची संवय होती. आणि लहानगी शांतासुद्धां त्यांचें भजन ऐकत एक-एक वाजेपर्यंत जागत असे. गाण्याचें बाळकडू तिला येथेंच मिळालें असावें.

शाळेंत तर शांतानें गायनांत बराच वरचा नंबर मिळवला. पुण्याला आल्यानंतर ती गायनाबरोबर नृत्याचेही धडे घेऊं लागली. १९३० सालीं शांता आपटे यांचे बंधु श्री. बाबुराव आपटे यांनीं त्याच्या गाण्याचा आणि नृत्याचा असा एक जोड कार्यक्रम थिएटरांत करून दाखविला. त्यावेळीं शांता आपटे यांचें वय पंधरा वर्षांचें असेल. या कार्यक्रमामुळें त्याची भीड चेपून दिवसेंदिवस गाणें आणि नृत्य यांत त्यांची प्रगति दिसून आली. आणि १९३१ सालीं त्यांनीं बोलपटसृष्टींत प्रवेश मिळवला !

परिक्षेंत पास कसा झाला– खाणावळीचें अन्न खाऊन मल्ल कसा बनला, ब्रह्मचारी राहून जंगलीमहाराजाचा दास कां झाला—– कॉलेजांत गैरहजर राहून टर्म कशी भरली—– ह्या गोष्टींचा उगम पाहूं नये. त्याचप्रमाणें नटीच्या बाबतींत सिनेमांत ती कां शिरली या गोष्टीकडे डोळेझांक करावी ! कुणाच्या पोटाचा प्रश्न असतो ! कुणाला ललितकलेची सेवा करावयाची असते. कुणाला मारून मुटकून काम करावें लागतें. शांता आपटे यांच्या बाबतींत निश्चित उगम शोधण्याचा प्रयत्न करणें योग्य असलें तरी आग्रहाचें खासच नाहीं. आणि म्हणूनच मीं त्या वाटेला न जाण्याचें ठरवलें आहे.

१९३१ सालच्या दादा तोरणे यांच्या सरस्वती सिनेटोनमध्यें 'शामसुंदर' या बोलपटांत काम करणारी ही दुबळी राधा पाहातांच ही राधा लोकलबोर्ड स्कूलच्या शाळेंत आवसेपौर्णिमेस जाणाऱ्या खेडवळ मुलीइतकीच सुशिक्षित असावी असा संशय येतो. आजच्या उगवत्या कॉंग्रेस तरुणाप्रमाणें तडफेचें काम करणारा शाहू मोडक आणि वाऱ्यानें खांद्यावरचा पदर उडतांच लज्जेनें लाल होणारी ही नगरी नारी–शांता आपटे ह्यांच्यामध्यें दिसून येणारा हा फरक निःसंशय धक्का देणारा होता. श्रीकृष्ण आणि राधा यांच्या प्रेमाची जी चर्चा ह. भ. प. करतात, ती केवळ शांता आपटेच्या राधेच्या भूमिकेच्या बळावरच कीं काय हा प्रश्न 'शाम सुंदर'मध्यें अभिनयाविरहित उभ्या राहणाऱ्या राधेप्रमाणेंच डोळ्यांपुढें उभा राहातो !

खेडेगांवांतील मेंगरूळ मुलगी शहरांतील मोठ्या वाड्यांत नांदूं लागली म्हणजे तिच्या राहणींत कुंकवापासून तो पोटऱ्यांपर्यंत जो फरक दिसून

येतो तोच फरक शांता आपटे यांनीं 'सरस्वती सिनेटोन' सोडून 'प्रभात फिल्म कंपनींत' प्रवेश केल्यावर दिसून आला. आणि हा महत्त्वाचा फरक करण्याचा मान शांताराम-बापूंचा होता हेंही विसरून चालणार नाहीं!

खेडेगांवांत एकाद्या कॉलेजांतील पाठीवर नागाप्रमाणें डोलणारा लांब लचक शेपटा सोडणारी, विकच्छ पायघोळ पातळ पेहेरणारी, खांद्यापर्यंत तोकडा असा गुलाबी ब्लाऊझ घालून अंग अच्छादणारी, पॉवडर स्नो सारख्या फसव्या रंगाची मुखचंद्रावरून खैरात करून रस्त्यावरून भटकतांना पाठीमागून येणाऱ्या तरुणाना घायाळ करणारी, अशी मुलगी गेली तर तिला पाहाण्यास कुतुहलानें जशी प्रचंड गर्दी लोटेल, तद्वत् शांता आपटे यांच्यासारख्या गुण सुंदरीला 'अमृतमंथन' या 'प्रभात'च्या बोलपटांत पाहाण्यास लोकांची गर्दी लोटत होती. या बोलपटांत शांता आपटे यांच्या बरोबर नायकाचें काम करणारे सुरेशबाबू यांची फडतूस भूमिका आणि शांता आपटे यांची तडफदार भूमिका यांत कितीतरी तफावत होती. आणि या बोलपटांतील त्यांनीं गायिलेली 'अमृत प्रकट झालें,' ही भैरवी तर खुमासदार होती. या बोलपटापासून शांता आपटे यांच्या बोलपट-सृष्टींतील बोलबाल्याला सुरवात झाली. हा बोलपट म्हणजे त्यांच्या पुढें उभारला गेलेल्या कीर्तिमंदिराचा पायाच ठरला!

शांता आपटे यांची 'अमृतमंथन'मधील भूमिका पाहून त्यांच्याच 'रजपूत रमणी' व 'वहाँ' या बोलपटांतील भूमिका पाहिल्यावर एक-दम पुण्याचें स्टेशन सोडून पाटस, केडगांव ह्या ठिकाणी गाडी उभी राहिल्यासारखी वाटते. दगडावर टाकीचे घांव मारणाऱ्या पाथरवटानें जर चित्रकाराचा कुंचला घेऊन चित्र रंगवायचें मनांत आणलें तर तो प्रयत्न जसा हास्यास्पद होईल, किंवा आपण चांगलें कापूं शकतों, अशी फुशा-रकी मारणाऱ्या शैदाड शिंप्यानें जर डॉक्टरच्याऐवजीं स्वतःच रोग्या-वर शस्त्रक्रिया केली तर जसा भलताच प्रसंग ओढवेल—त्याप्रमाणें दिग्द-र्शनाच्या बाबतींत निष्णात नसतांना शांता आपटे यांना आपल्या बोलपटां-तून काम देऊन कांहीं दिग्दर्शकांनीं ज्या बोलपटांच्या बाबतींत हात दाखवून अवलक्षण मात्र करून घेतलें त्याच प्रकारांत वरील दोन बोलपट मोडतात.

ह्यानंतर 'अमरज्योती' ह्या बोलपटांतील 'सुनो सनो बनके प्राणी' या भावमधुर आणि अभिनययुक्त पदानें शांता आपटे यांनीं यशाच्या तेवत असलेल्या, परंतु मध्यंतरी किंचित् मंदावलेल्या, नंदादीपाची ज्योत तेवतच राहावी—अमर राहावी— असा प्रयत्न केला. 'अमरज्योती'मधील आपल्या भूमिकेनें शांता आपटे यांनीं आपल्या अभिनयाच्या चमकत्या चांदणीचा पौर्णिमेचा चंद्र झालेला पाहण्यास प्रेक्षकांना 'अमर-ज्योती' बोलपट पाहाण्यास भाग पाडलें. आणि प्रेक्षकांनाहि रात्रीं बोलपट पाहून घरीं जाताना 'आकाशांत गर्वानें डुलणारा चंद्रहि आपल्याला प्रतिस्पर्धी मिळाला' हें समजून खजील होऊन मान खालीं घालत आहे असें दृश्य दिसल्याचें आढळून आलें.

महाराष्ट्र रंगभूमीवर एकेकाळीं गाजलेल्या केशवराव दाते यांच्या-सारख्या नटश्रेष्ठासमोर आपली सामाजिक बोलपटांतील पहिलीच अव्वल दर्जाची भूमिका करून शांता आपटे यांनीं यशाचा कुंकुमतिलक 'कुंकू' बोलपटांत आपल्या भालप्रदेशावर लावला. पण पुढील बोलपटांतच तो थोडासा पुसट होईल अशी कल्पना तरी त्यांना त्यावेळीं होती का?

'एक होता राजा आणि एक होती राणी' हें पद 'गिरकी मारीत म्हणणारी 'कुंकू'तील नीरा! आणि 'हासत नांचत जाऊं-जाऊं चला गोकुळाला' हें पद 'गोपालकृष्णांत' म्हणणारी राधा!— अरे बापरे! 'शेठाणीनो बात करो' असें वाटत नाहीं काय?

वर्तमानपत्रकारांच्या अमाप स्तुतीनें बेफाम बनणाऱ्या—— सन्मित्रांच्या गुणानुवादाच्या गुंजारवानें पुष्ट बनणाऱ्या— तारुण्याच्या उन्मादक उत्साहा-बरोबर परिस्थितीचा पेंच न समजतां कंपनीचा उंबरठा ओलांडणाऱ्या— नटी; ह्यांची गत काय होते ह्याचा जिवंत पुरावा हवा तेवढा दाखवतां येईल! पण जाऊं द्या!— याच वेळीं 'प्रभात' कंपनीशीं शांता आपटे यांनीं केलेला करार संपला, आणि शांता आपटे यांनीं याच वेळीं उपवासाचें दीड दिवसाचें नाटक करून प्रभात फिल्म कंपनीला राम-राम ठोकला.

दिग्दर्शकांच्या व बोलपट कंपनींच्या मालकांच्या गुणावगुणांचा विचार न करतां कानांवर येणाऱ्या भरभक्कम पगाराच्या खण ऽऽ च्या आवाजानें

शांता आपटे यांच्यासारख्या अभिनयसम्राज्ञीनें !– त्या डेक्कन क्वीननें आज इकडचें टोंक तर उद्यां तिकडचें टोंक अशी सिनेमाक्षेत्रांत धांवपळ करून फ्लाइंग क्वीन बनावयास नको होतें. वास्तविक त्याची जरूरी नव्हती.

'प्रभात फिल्म कंपनींतून' बाहेर पडल्यानंतर शांता आपटे या एकाच फिल्म कंपनींत अशा फार दिवस राहिल्याच नाहींत. इंग्रजींत ज्याला 'Free lancing' म्हणतात त्याप्रमाणें शांता आपटे Free lancer झाल्या. त्यांनीं पुण्याहून एकदम मद्रासची वाट धरली. आणि तामीळ भाषा शिकून 'सावित्री' नावाच्या तामीळ बोलपटांत एक प्रमुख भूमिका केली. महाराष्ट्रीय नटीनें असा पराक्रम केलेल्या शांता आपटे ह्या पहिल्याच होत. तामीळ बोलपटांतील आपल्या भूमिकेनंतर पांच वर्षांच्या विश्रांतिनंतर त्यांनीं 'सिर्को'च्या 'आपना घर'मध्यें 'पांचोली'च्या 'जमीनदार'-मध्यें आणि अगदीं अलीकडे 'प्रफुल्ल पिक्चर्स'च्या 'सुभद्रा' या बोलपटांत ठळक भूमिका केल्या आहेत. त्यांच्या या बोलपटांतील भूमिका त्यांनीं उत्कृष्टच वठविल्या आहेत. पण त्याची बरोबरी 'प्रभात'च्या बोलपटांत केलेल्या भूमिकांशीं करावयास मी तयार नाहीं. याबाबत मी जास्त चर्चा करून यावर पुष्कळच प्रकाश पाडण्यास समर्थ आहें. परंतु कांहीं विशिष्ट कारणा-मुळें याबाबत मी तटस्थाचीच भूमिका स्वीकारणार आहें.

मंडईतल्या माळणीला–– मोटार स्टॅंडवरच्या महमदाला–– कचेरींतील कारकुनाला–– विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्याला–– आणि रंगीला रसूलला– या सगळ्यानाही मात्र आवडेलच अशी भूमिका वठवणें कुठल्याच नटीला जमणार नाहीं. शक्य नाहीं. पण त्यांतल्या त्यांत भूमिकांशीं समरस होऊन शांता आपटे काम करतात– त्यामुळेंच त्यांची गणना प्रेक्षकांच्या आवडत्या नटींत केली जाते.

शांता आपटे यांच्या आवाजांत गोडवा आहे. त्यांच्या कंठांत माधुरी आहे. त्यांनीं भावगीत गायलेली रेकॉर्ड असो कीं उस्तादी चीज गायलेली ध्वनिमुद्रिका असो— ती चांगली असणारच हा प्रघात पडून गेलेला आहे.

सिनेमा क्षेत्रासारख्या भयंकर धकाधकीच्या मोहल्यांत शांता आपटे यांच्यासारख्या प्रतिष्ठित आणि सुशिक्षित स्त्रीनें प्रवेश करून आपला लौकिक अजून कायम टिकवला आहे हें त्यांना खरोखरच भूषणावह आहे.

मुंबई विद्यापिठाच्या मॅट्रिकच्या परीक्षेंत पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्यांचें जसें कोडकौतुक करावेंसें वाटतें, किंवा शंभर धांवा काढणाऱ्या खेळाडूला जश्या शाबासकीच्या टाळया द्याव्याशा वाटतात, तसेंच शांता आपटे यांनीं बोलपटसृष्टींत प्रवेश केल्यापासून मिळवलेली अफाट लोकप्रियता पाहून सिनेमारसिकांना तिच्या गुणांभोंवतीं गुजारव करावासा वाटल्यास मला त्यांत कांहींच नवल वाटणार नाहीं. मनमोकळेपणा व योजून दिलेल्या भूमिकेशीं तद्रूप होऊन भूमिका करण्याची आवड हेंच त्यांच्या स्वभावाचें प्रतिबिंब आहे. शांता आपटे ह्या शिस्तीच्या भोक्त्या आहेत. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांना बोलायला थोडेंच आवडतें. त्या खाजगी आयुष्यांत अत्यंत खेळकर आहेत. टेनीस, पिंगपॉंग हे त्यांचे आवडते खेळ आहेत. आणि पोहण्याची व घोड्यावरून रपेट करण्याची तर त्यांना अतोनात हौस आहे.

गायन– अभिनय आणि सौन्दर्य ह्या त्रयींचा सुसंगम झालेली अशी शांता आपटे यांच्याखेरीज एकाददुसरीच नटी असेल. जी नटी सौन्दर्यवान् आहे ती कदाचित् अभिनयाचे बाबतींत मागासलेली असेल. किंवा जी नटी उत्तम गाणारी असेल तिला अभिनय आणि सौन्दर्य यांची जोड लाभलेली नसेल. परंतु शांता आपटे या तिन्ही गुणांनीं युक्त असल्यामुळें अखिल हिंदुस्थानांतील श्रेष्ठ दर्जाची तारका असा त्यांचा गौरव करणें मला भाग आहे.

## १० : अनंत काणेकर

अनंत काणेकर ! सातां समुद्रांपलीकडे प्रवास करून आलेल्या या सात अक्षरी नांवाच्या व्यक्तींत कांहीं दिवसांपूर्वी मला हार्मोनियमच्या सप्तसुरांतून निघणाऱ्या सुरेल स्वराइतकी माधुरी वाटत होती. पण आज ! 'शाम-सुंदर' आणि 'औट घटकेचा राजा' या बोलपटांतील शाहू मोडकच्या अप्रतिम भूमिका पाहून त्याच्यासंबंधीं प्रेक्षकांनीं फार मोठ्या आशा-आकांक्षा हृदयाशीं बाळगल्या होत्या. पण ज्याप्रमाणें त्यानें त्या पार धुळीस मिळविल्या; त्याचप्रमाणें अनंत काणेकरांच्या बाबतींतही तशीच गत झालेली आहे असें म्हणण्यांत मला तरी कांहींच प्रत्यवाय वाटत नाहीं.

'आला खुशींत समिंदर' हें दर्यावरील लाटेसारखेंच मनाला हेलकावे देणारें- किंवा 'चल गे सजणे रानामधें, चाफ्याचं फूल तुझ्या कानामध्यें' असलीं कर्णमधुर पदें रचणारे काणेकर— 'पठाणाचें हृदय' ही 'हृदय-स्पर्शी' लघुकथा व 'कालप्रवाहाशीं झुंज' देणाऱ्या वेश्येचें वास्तव-वादी जीवन रंगविणारे काणेकर- 'धुक्यांतून लाल ताऱ्याकडे' हें प्रवास वर्णन लिहून 'पृथ्वी वाटोळी आहे.' हा संदेश देणारे काणेकर- 'रसेल-नीति' या प्रबंधात्मक पुस्तकाचे कर्ते समाजवादी काणेकर- 'मृत्यूशय्ये'-वरून बेताल बडबड करणाऱ्या 'शेज' वलकरना खरोखरच खूप बोचेल असें टीकेचें इंजेक्शन देणारे काणेकर- 'महाराष्ट्र पुढें आहे' हा पुरोगामी विचारांनीं भरलेला आणि अस्सल महाराष्ट्रीय बाणा दाखविणारा लेख लिहिणारे काणेकर- शांतारामबापूंच्या अफाट लोकप्रियता मिळविलेल्या 'माणूस' बोलपटाचे 'जिवंत' संवादलेखक काणेकर— आज चार वर्षे सुभाषबाबूंप्रमाणें कोठेंतरी गडप झाले असावेत, असा पदोपदीं मला भास होत आहे. खरोखरीच मला तसें वाटत आहे.

काणेकरांसारख्या प्रथितयश लेखकाच्या हल्लींच्या कांहीं लेखांवर त्यांचें नांव नसतें तर तें सर्व लेखन संपादकांकडून साभार परत गेलें असतें अशी माझी खात्री आहे. 'एकाद्या बड्या धेंडाचें नांव लेखाच्या टाळक्यावर असलें म्हणजे तो लेख शिरसावंद्य मानला जाऊं नये' हें बापू कोल्हटकरांचें विधान मला पूर्ण संमत आहे. पण 'अनंत काणेकर' या नांवाखालीं लिहिलें जाणारें हल्लींचें लिखाण हें 'आमचे' काणेकर लिहीत नसावेत असा माझा समज आहे. पण नाहीं तरी कसें बरें म्हणतां येईल ? समज म्हणजे कांहीं सत्यता नाहीं. कारण त्यांच्याच कांहीं लेखांवर त्यांची छबी ( Block ) छापलेली असते. ती छबी पाहून त्या लेखांचें पितृत्व काणेकराकडे देणें आपल्याला भाग पडतें आपल्या काळ्यासांवळ्या आणि निर्बुद्ध मुलाबद्दल एकाद्या बापाला कितीही कौतुक वाटलें, तरी आजूबाजूचे लोक त्याच्या हुषार मुलाचीच तारीफ करीत असतात. त्याचप्रमाणें काणेकरांना आपल्या सध्यांच्या वाङ्मयीन अपत्यांबद्दल कितीही आपलेपणा वाटत असला, तरी आम्ही त्याच्या हल्लींच्या सदोष लिखाणावर टीकाच करूं; मात्र त्याचबरोबर त्यांच्या गुणी वाङ्मय-अपत्यांचें कौतुकही करूं.

हल्लीं काणेकरांनीं परदेशीय साहित्य येथें आणून त्यावर 'महाराष्ट्रमां बनेलो माल' असा छाप मारून तें साहित्य 'छेपून' आणण्याचा अव्यापारेषु व्यापार चालविलेला आहे. काणेकर, 'डॉल्स हाऊस' ह्या कलाकृतीचें भाषांतर करण्याची तुमची 'हौस' पाहून परदेशी साहित्याच्या चर्चेमध्यें आम्हीं तुम्हांला प्रवेश करूं दिला. येवढेंच नव्हे तर, 'ऑलिव्हर गोल्डस्मिथ'च्या 'She Stoops to conquer' या कलाकृतीला मराठी वाङ्मयालंकारानें सजवून 'निशिकांतची नवरी' बनवलीत, तरीही आम्हीं तिला 'अष्टपुत्रा सौभाग्यवती' म्हणून आशीर्वादही दिला. पण तो आशीर्वाद आपल्याच 'प्रतिभेला' आहे असें समजून आपण 'घे आंग्ल वाङ्मयातील एकांकिका आणि कर तिचें मराठी रूपांतर' हें जें आंग्ल वाङ्मयसुंदरीचें 'बाळंतपण' चालू केलें आहे, त्यानें मात्र मराठी वाचकवर्ग 'गर्भगळित' झाला आहे ! तुमची 'धूर आणि एकांकिका' वाचकांना दुःखी करून त्यांच्या डोळ्यांतून खरोखरीच पाणी काढते ! आपलीं कांहीं दिवसांपूर्वीं प्रसिद्ध होणारीं

'रशियन' नाट्यपत्रकें वाचून आणि तीं एकवार वाचून न समजल्यामुळें पुनः वाचून वाचकांचे डोळे मात्र विनाकारण 'लाल' होत आहेत! आपण लिहीत असलेल्या आजकालच्या लघुकथा आणि रूपकें वाचून एकाद्या हस्तलिखित मासिकांतील नवोदित लेखकबुवांची कथा तर आपण वाचीत नाहीं ना असें वाटूं लागतें!

काणेकरांचा लघुनिबंधांतील 'गणू काका' त्यांना सोडून नव्वद रुपयां-वर मिलिटरी अकौन्टसमध्यें नोकरीला लागला असावा अशी अंधुक शंका माझ्या मनांत डोकावत आहे. आणि त्यामुळेंच काणेकरांच्या हातून चांगले लघुनिबंध लिहिले जात नसावेत अशी माझी समजूत आहे. 'पिकलीं पानें' आणि 'तुटलेले तारे' यांतील उत्कृष्ट लघुनिबंधांसारखे लघुनिबंध लिहायचें सोडून काणेकर आजकाल जे 'तारे तोडीत' आहेत, ते पाहून वाचकांच्या डोळयासमोर मात्र खरोखरच 'काजवे' चमकावयास लागले आहेत. आणि काव्यदेवी त्याच्यावर रुष्ट होऊन दूर दूर गेल्यामुळें ते नाट्यदेवीच्या आराध-नेस लागले आहेत. त्याचें 'पांढऱ्यावर काळें' केलेलें लिखाण वाचून वाचकांना मात्र आतां 'काळें' करावें असें वाटूं लागलें आहे!

आंग्ल वाङ्मयांतील कलाकृतींचें रूपांतर करण्याची कल्पना मला सहन होत नाहीं, मला पटत नाहीं असें म्हणण्याचा माझा वास्तविक उद्देश नाहीं. शामराव ओकांच्या 'चोरबाजारांतील चिजा' या आंग्ल वाङ्मयांतील रूपांतरीत कथाचें 'चीज' झालेंच ना? फडक्यांच्या 'वादळ' या भाषा-तरीत कादंबरीला कोण बरें नावें ठेवील? पण या कलाकृती वाचकांची 'पकड' घेतात. काणेकराच्या रूपांतरित कलाकृती वाचतांना मात्र वाचकांना विनाकारण काणेकरांच्या 'तावडींत' सांपडल्यासारखें वाटतें! काणेकरां-सारख्या प्रतिभावान साहित्यिकानें स्वयंस्फूर्त (original) वाङ्मय निर्माण करण्याचें सोडून परदेशी-मालाची आयात कां चालवली आहे हें मला आकलन होत नाहीं. जुन्या पिढींतील लोकांना आवडेल आणि नव्या पिढींतील लोक तर उत्सुकतेनें वाचतील, अशा तऱ्हेचें वाङ्मय काणेकरच निर्माण करीत होते. जुन्या आणि नव्या पिढींतील लोकांना आवडणारें; जे

चार दोनच साहित्यिक आहेत त्यांत काणेकरांची गणना होत होती. रांगणेकरांचें साहाय्य घेऊन काणेकर जेव्हां 'चित्रा' आणि 'आशा' संपादीत होते, तेव्हां एक आदर्श पत्रपंडित या नात्यानें सारा तरुणवर्ग काणेकरांकडे कौतुकमिश्रित उत्सुकतेनें पाहात होता. पुण्याच्या वसंत व्याख्यान मालेंतील काणेकरांचें सुश्राव्य व्याख्यान ऐकून 'मुद्देसूद आणि लोकांना आपलं म्हणणं पटवून देतां येईल अशा रीतीनं' बोलणारा एक प्रभावी वक्ता या दृष्टीनें मी काणेकरांकडे पाहात होतों. पण आज ?

काणेकर, मुंबईतील खालसा कॉलेजनें आपल्याला प्राध्यापक करून आपल्या विद्वत्तेचा गौरव केला आहे. आणि जर पूर्वीसारखेच वाङ्मय निर्माण करीत राहिलां असतां, तर महाराष्ट्र साहित्य-सम्मेलनाचें अध्यक्षपद आपल्यापासून फार दूर नव्हतें येवढेंच मी म्हणतों. आणि मग, लहान वयांत अमरनाथनें एम्. सी. सी. विरुद्ध सेंचरी केली म्हणून अखिल हिंदुस्थाननें त्याचें जसें कौतुक केलें–तसेंच, आजपर्यंत झालेल्या महाराष्ट्र साहित्य-सम्मेलनाच्या अध्यक्षात वयानें लहान अध्यक्ष–– पण विद्वत्तेनें तेवढाच उच्च, म्हणून मानानें आम्हांला तुमच्याकडे बोट दाखवितां आलें असतें !

काणेकर, तुमच्यासंबंधीं आम्हीं मनाशी बांधलेल्या अपेक्षांच्या मनोऱ्याला तुमचें हल्लीचें लिखाण विलक्षण धक्के देत आहे. असेच आणखी कांहीं धक्के बसत राहिले, तर तो मनोरा कोसळायला फारसा वेळ लागायचा नाहीं; एवढा धोक्याचा इषारा देणें आपला एक चाहता या नात्यानें माझें कर्तव्य आहे. Excuse हं !

जातां जातां मराठी साहित्य-मंदिरांतील 'सरस्वतीदेवी'जवळ माझें एक मागणें आहे. तिचा एक निस्सीम भक्त या नात्यानें माझी अल्प मागणी ती पुरी करील असा मला भरंवसा आहे. देवी, हल्लींसारखे रटाळ लिहिणारे 'अनंत' काणेकर निघतील–– आम्हांला ते नको आहेत ! आम्हांला 'चांदरात' दाखविणारे, 'माणूस' बोलपटाचे संवाद-लेखक 'अनंत काणेकर' पाहिजेत !

## ११ : मो. ग. रांगणेकर

रांगणेकर ! हें नाव उच्चारतांक्षणींच जर प्रथम कोणती व्यक्ति डोळ्यांसमोर येत असेल तर ती म्हणजे हिंदुस्थानांतील प्रसिद्ध डावखोरा क्रिकेटपटु खंड्या रांगणेकर हा होय ! आणि त्याच नावाचा पुनः उच्चार केला तर जी दुसरी व्यक्ति दृष्टिसमोर येते तिचे संपूर्ण नांव मो. ग. रांगणेकर हें आहे ! कै. तुतारी, कै. वसुंधरा, कै. आशा व चित्रा या मासिकांचे भूतपूर्व संपादक आणि 'नाट्य-निकेतन' या नाट्यसंस्थेचे एक कर्तबगार चालक व प्रभावी नाटककार या तिन्ही नात्यानें मराठी वाचकवर्ग आजकाल रांगणेकरांना 'पुरेपूर ओळखीत' आहे !

हल्लीं जिनें रंगभूमी दणाणून सोडली आहे त्या 'नाट्य-निकेतन' या कंपनीला सुस्थिति आणि भरपूर लौकिक प्राप्त करून देणारे एक कर्तबगार चालक आणि प्रभावी नाटककार म्हणून जरी आजकाल रांगणेकर प्रसिद्ध असले तरी या गृहस्थानें आपल्या आयुष्यांतील पूर्वभाग वृत्तपत्र-व्यवसायातच घालवलेला आहे, हें मला वाटतें, बऱ्याच जणांना माहीत आहे.

१९३२ सालीं रांगणेकरांनीं जेव्हां 'तुतारी' या नांवाचें साप्ताहिक चालवलें होतें, त्यावेळीं त्यांचें वय माझ्या माहितीप्रमाणें पंचविशीच्या आतबाहेर असेल. तथापि 'तुतारी'चें संपादन ते ज्या कौशल्यानें करीत त्यामुळें त्यांचें सार्वत्रिक कौतुक होऊं लागलें. त्यांची या वयांतली वृत्तपत्रीय निपुणता आणि खऱ्या संपादकास लागणारी चमक पाहून मीं त्याचवेळीं मनाशीं तर्क बांधून ठेवला कीं, रांगणेकर हे महाराष्ट्रांतील एक प्रभावी संपादक होतील. आणि माझा तो तर्क, माझी ती अपेक्षा लौकरच सत्यसृष्टींत अवतरली हें नमूद करण्यास मला अंतःकरणपूर्वक आनंद होत आहे. कांहीं

वर्षांनीं ‘ तुतारी ’ ‘ बद्द ’ होऊन ‘ बंद ’ झाल्यावर रांगणेकरांनीं दुसऱ्याच चालकाच्या देखरेखीखालीं निघालेल्या ‘वसुंधरा’ या साप्ताहिकांत संपादकाच्या रूपानें प्रवेश केला. हें साप्ताहिक त्यावेळीं कॉलेज-विद्यार्थ्यांत फारच लोकप्रिय झालें. आणि ही ‘वसुंधरा’ ही कांहीं काळानंतर ‘ थंड ’ झाल्यावर रांगणेकरांनीं अनंत काणेकरांना, प्रभाकर पाध्यांना, दत्तु बांदेकरांना, पर्वत्यांना, मदतीस घेऊन लोटावाल्यांच्या चालकत्वाखालीं ‘ चित्रा ’ साप्ताहिक सुरू केलें. नवीन आकर्षक सदरांमुळें, हें साप्ताहिक इतकें लोकप्रिय झालें कीं या साप्ताहिकानें ‘ विविधवृत्ताच्या ’ खपावरही बराच परिणाम केला ! परंतु— या साप्ताहिकाच्या चालकांशीं उद्भवलेल्या कांहीं वादग्रस्त प्रश्नांमुळें व भांडवलशाहीच्या मुजोरीला मान न तुकावल्यामुळें रांगणेकर व काणेकर यांना या साप्ताहिकाला रामराम ठोकावा लागला—– आणि त्यानंतर या दोघांनीं ‘ चित्रा ’च्या धर्तीवर ‘ आशा ’ नांवाचें साप्ताहिक सुरू केलें. परंतु वर्षा-दीड वर्षाचा कालावधि लोटतो न लोटतो तोंच साप्ताहिक बंद पाडण्याच्या यमाचा घाला ‘ आशा ’वर पडला. —– आणि दीड वर्षाच्या या आशेनें शेवटचा श्वास सोडला. – आणि वाचकांची संपूर्ण निराशा केली.

या दहा-बारा वर्षांत रांगणेकरांनीं वृत्तपत्रव्यवसायांत चांगलेंच नाव कमावलें. विनोदी– चटकदार– आणि चुरचुरीत लिखाणाची एक नवीन ‘ तऱ्हा ’ त्यांच्या लेखणींत होती. आणि याच प्रतिभेच्या जोरावर त्यांनी साप्ताहिकांतून नवनवीन आकर्षक सदरें सुरू केलीं, व तीं लोकाना आवडलींही. या सदरांतील त्यांची कल्पकता नाविन्यपूर्ण होतीच, परंतु आजकाल निरनिराळ्या साप्ताहिकांतून जे चटकदार लिखाणाचे नमुने आपणास दर आठवड्यात पाहण्यास मिळतात, त्यांचें जनकत्व रांगणेकरांकडेच आहे ही गोष्ट आपल्याला विसरून चालणार नाहीं.

‘ बालगंधर्वांनीं ‘ धर्मात्मा ’मध्यें एकनाथाची पुरुष-भूमिका कां केली ? ’ ‘ नांवांत काय आहे ’ ‘ येत्या वर्षाचें संगीत भविष्य ’ ‘ महाराष्ट्रीय बोलपट संमेलन ’ ‘ दिवाळीनिमित्त तीन दिवसांचा रेडिओचा कार्यक्रम ’ ‘ कुलीन नटींचें संमेलन ’ वगैरे रांगणेकरांचे या साप्ताहिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध

झालेले हे लेख त्या त्या वेळीं तर गाजलेच परंतु या लेखांच्या अनुकरणाखरच आजकाल साप्ताहिकांतून अशा प्रकारचे विनोदी लेख प्रसिद्ध होत आहेत.

रांगणेकरांच्या विनोदाची ‘ लज्जत ’ कळण्यासाठीं मी तीन-चार उदाहरणें देतों. एकादी बातमी देऊन रांगणेकर जी मल्लीनाथी करीत ती कशी होती पाहा.

( १ ) “ पुण्याच्या प्लॅटफॉर्मवर तिकिट घेण्यासाठीं तिकिटाच्या यंत्रांत एक आणा टाकून हँडल ओढलें; पण तिकिट वगैरे कांहींएक न मिळता एक आणा मात्र फुकट्या यंत्रानें गिळला; अशी एक तक्रार एका प्रवाशानें ‘ केसरी ’त केली आहे ”--

“ जेथें हजारांनीं फंड गिळंकृत होतात, तेथल्या एका बापड्या यंत्रानें एक आणा गिळला तर नवल नाहीं ! ”

( २ ) “ ग्रीटा गार्बो ही प्रख्यात् सिनेमा-नटी होलीवूडहून गॉथेनबुर्ग येथें आली तेव्हां ती सात पोलिसांच्या पाहाऱ्यांत तेथें उतरली. ”--

यांत कसलें आश्चर्य ! पंधरा दिवसांपूर्वी येथील एमेलिन ह्या सिनेमा-नटीला फाजील वेगानें मोटार हांकल्याबद्दल कोर्टांत आणण्यांत आलें, तेव्हां तिच्या बरोबरही पंधरा पोलिसांचा पाहारा होता.

( ३ ) “ जग प्रसिद्ध नकलाकार बर्नार्ड शॉ याना अमेरिकेनें येण्याबद्दल दिलेलें आमंत्रण त्यांनीं पुन्हां यंदाही नाकारलें. ”--

आतां अमेरिकेला शॉकडे जाणें भाग आहे !

( ४ ) “ डोळे हे जुलमी गडे-- या रेकॉर्डनें प्रसिद्धी पावलेले श्री. गोविंदराव जोशी यांचा धुळें येथें गायनाचा जलसा चालू असतां त्यांना एक विंचू चावला ! ”

विंचवालाही संगीतांत बरें-वाईट कळूं लागलें काय ?

( ५ ) “ देविकाराणी आणि माधुरी यांच्यामध्यें चांगली कोण गाते ? ”

सवितादेवी !

अशा तऱ्हेच्या बातम्या देऊन त्यावर मल्लीनाथी करण्याचा उपक्रम प्रथम रांगणेकरांनींच सुरू केला.

यावेळीं मला सहज आठवलेली रांगणेकरांच्या खट्याळपणाची एक गंमतीदार गोष्ट सांगतों.

रांगणेकर 'चित्रा'चे संपादक असतांना त्यांनीं 'माझे चित्रपट अयशस्वी कां झाले?' अशी एक लेखमाला चित्रांतून छापण्याचें ठरविलें, आणि ह्या लेखमालेंत प्रो. फडके यानीं एक लेख लिहावा अशी रांगणेकरानीं त्यांना विनंति केली. या विनंतींत थोडासा खंवचटपणा होता. कारण प्रो. फडके यांनीं लिहिलेला 'तुळसीदास' हा बोलपट सपशेल आपटला होता. फडक्यांनीं रांगणेकरांचा खंवचटपणा ओळखून त्यांना लिहिलें— 'मीं काढलेलीं साप्ताहिकं कां बुडाली अशी एक लेखमाला आपण सुरू करा आणि तिच्यांत पहिला लेख लिहिण्याचा मान तुमच्याकडे येतो तो घ्या.' हें फडक्यांचें प्रतिखट्याळपणाचें उत्तर ऐकून रांगणेकरांनीं फडक्यांचा नाद सोडला.

'तुतारी' 'वसुंधरा' 'आशा' ही साप्ताहिकें सुरू करून आणि यशस्वी रीतीनें चालवून तीं बंद करण्याची शोचनीय पाळी रांगणेकरांवर कां यावी हें मला कांहीं समजत नाहीं. रांगणेकर, आपण सध्यां वृत्तपत्र-व्यवसाय सोडून पैशाच्या लोभानें नाट्य-व्यवसायाकडे वळलां असलांत तरी, चालू महायुद्ध आतां संपलें आहे, पुनः एक चटकदार साप्ताहिक आपण काढावें ही आपल्यासंबंधींची माझी पहिली अपेक्षा आहे.

वृत्तपत्रव्यवसायांत रांगणेकर जेवढे चमकले तेवढेच ते बोलपटसृष्टींत सपशेल आपटले! त्यांच्या एका बोलपटाच्या नांवाप्रमाणेंच बोलपटसृष्टींत ते 'औट घटकेचा राजा' ठरले! सरस्वती सिनेटोनकरितां 'औट घटकेचा राजा' ही बोलपट-कथा लिहून त्यांनीं बोलपट-कथेचा श्रीगणेशा केला. त्यानंतर त्यांचे 'सुवर्णमंदीर' व 'नंदकुमार' हे बोलपट रुपेरी पडद्यावर आले, परंतु बोलपट-कथालेखक म्हणून त्यांचा कधींच बोलबाला झाला नाहीं. 'औट घटकेचा राजा' हा बोलपट जेव्हां मीं पाहिला तेव्हां रांगणेकर हे एक बऱ्यांपैकीं कथा-लेखक होतील अशी मला आशा होती. अशी माझी अपेक्षा होती. परंतु रांगणेकरांनीं ती सपशेल कोलमडून पाडली!

आतां रांगणेकरांकडे 'नाटककार' या दृष्टीनें बघण्याआधीं मराठी नाट्य-वाङ्मयाचा प्रवाह सध्यां काय आणि कोठें चालला आहे त्याचा थोडक्यांत विचार करण्याचें मीं ठरवलें आहे.

कलादेवीच्या रंगभूमी आणि बोलपटसृष्टि या मुली आहेत असें मी मानतों. दहा वर्षांपूर्वी बोलपटसृष्टीचा उदय होत असतांना रंगभूमी अस्त पावत होती. रंगभूमी शेवटचा श्वास सोडण्याच्या पंथांत होती. परंतु अत्र्यांच्या नाटकांनीं तिला योग्य तो औषधोपचार मिळाला. आणि रंगभूमी पुनः अंगानें भरूं लागली! आज पुण्या-मुंबईस बऱ्याच नाटक कंपन्या स्थापन झाल्या आहेत. बालगंधर्वांच्या 'गंधर्व नाटक मंडळी'चा मुक्काम जरी वर्षांतून बराच काळ फलटणसारख्या आडगांवीं पडत असला (!) तरी त्यांनाही भरपूर पैसा मिळत आहे. लोंढ्यांच्या 'राजाराम संगीत नाटक मंडळी'चीं नाटकें पाहण्यास लोकाची लोंढेच्या लोंढे गर्दी लोटत होती. बालमोहन संगीत नाटक मंडळीच्या बालेकिल्ल्यांतून कांहीं नट बाहेर पडले असून त्यांनीं नवीन नाट्यसंस्था स्थापली आहे. रंगभूमीला तिचें पूर्वीचें वैभव प्राप्त होवो असें मी मनःपूर्वक इच्छितों. मात्र नवीन नीति, नवीन तंत्र आणि मंत्र वगैरे सर्व नवीन गोष्टींच्या 'नवमतवादी तुतारींतून' बाहेर पडणाऱ्या ललकाऱ्या ऐकून या नवीन नाटक कंपनींच्या मालकांना मला कांहीं सूचना करावयाच्या आहेत. या नाटक कंपन्यांनीं नवनवीन लेखकांचीं नाटकें रंगभूमीवर आणलीं पाहिजेत. मात्र हीं नाटकें तीन तासांत आटपतील अशींच असावींत. आजकाल पडद्यावर दिसणाऱ्या नटनटींना रंगभूमीवर पाहावें— त्यांचें गाणें प्रत्यक्ष ऐकावें असें रंगभूमीच्या प्रेक्षकांना वाटूं लागलें आहे, म्हणून अशा नटनटींना रंगभूमीवर आणावें. या नवीन नाटकांतील चाली सिनेमा-संगीत-दिग्दर्शकांकडून बांधून घ्याव्यात. माझ्या या सूचना रांगणेकरांनीं आधींच अंमलांत आणल्या आहेत. त्यांनीं 'नाट्यनिकेतन'च्या रंगभूमीवर आतांपर्यंत ज्योत्स्ना भोळे, विमल सरदेसाई, आशालता, कुसुम देशपांडे, ललिता पवळकर, मंगला रानडे, अविनाश, जहागिरदार, या नट-नटींना आणलें, त्याचप्रमाणें त्यांनीं त्यांच्या नाटकांतील गाण्यांना मास्तर कृष्णराव, केशवराव भोळे यांच्याकडून चाली बांधून घेतल्या, रांगणेकरांनीं

या गोष्टी केल्या म्हणूनच मी त्यांना नेहमी 'खरा धंदेवाईक' असें म्हणतों.

समाजांतील विविध प्रश्नांचें स्वतंत्र रीतीनें उद्घाटन करून तें नाटकांत पात्रांच्या तोंडून चर्चावयाचें असा प्रघात रांगणेकरांपूर्वी हल्लींच्या नाटककारांत फक्त अत्र्यांनींच केला. स्वतंत्र नाटकें लिहून आजची रंगभूमी जिंकण्याचा मगदूर एकाच्याही अंगात यापूर्वी नव्हता. जो उठे तो इब्सेनच्या नाट्यसुंदरीचें बाळंतपण करूं लागे--! समाज-सुधारणेची अगर एका विशिष्ट मताच्या पुरस्काराची भूमिका स्वीकारून सामाजिक अन्यायांवर हल्ला चढविण्यांत कुशल अशा नाटककारांत रांगणेकरांचा समावेश मी करीन. प्रहसनवजा नाटकाची चलती सध्यां जोरांत असल्यामुळें आजकाल तशींच नाटकें सर्रास रंगभूमीवर येत आहेत. नाटककाराची वृत्ति– नाटककाराचें अंतरंग जर हास्यरसानुकूल असेल व त्याच्या नाटकांत जो संवादाचा ठसकेबाजपणा लागतो तो असेल, आणि त्याच्या नाटकांत जर उत्कटता खरीच वास करीत असेल तर त्याचें नाटक रंगभूमीवर गाजल्याशिवाय राहात नाहीं.

रांगणेकरांचीं आतांपर्यंत पांच सहा नाटकें 'नाट्यनिकेतन'च्या रंगभूमीवर आलीं; व एक नाटक 'आदर्श नाट्यालय'च्या रंगभूमीवर आलें. या सर्व नाटकांत 'कुलवधू' व 'कन्यादान' हीं दोनच नाटकें 'गल्लाभरू' ठरलीं. बाकीचीं नाटकें पैशाच्या दृष्टीनें यथा-तथाच ठरलीं! 'मुली वयांत आल्यावर त्यांचीं लग्नें न करून देतां त्यांनीं सदैव आपल्यापाशींच राहावें.' असा हव्यास धरणाऱ्या एका वृद्ध पित्याची कहाणी 'आशीर्वाद' या नाटकांत रांगणेकरांनीं कथन केली आहे. 'कुलीन नटीचें शील सिनेमांत जाऊन अभंग राहूं शकतें कीं नाहीं?' या प्रश्नाचा उहापोह रांगणेकरांनीं 'कुलवधू' नाटकांत केला आहे. मात्र हा प्रश्न जगाच्या अंतापर्यंत तरी सुटेल कीं नाहीं याची मला जबरदस्त शंका आहे! 'एकमेकांच्या बायकांवर एकमेकांचें लक्ष' हें 'नंदनवन' नाटकाचें सार आहे. 'घरजांवई करून ठेवलेल्या नवरोबांना पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें मिळणारी वागणूक' हा 'कन्यादान'चा प्लॉट आहे तर 'मंगळसूत्र' हाच स्त्रीचा खरा अलंकार हा सन्देश रांगणेकरांनीं 'अलंकार' नाटकांत दिलेला आहे.

रागणेकरांचीं हीं नाटकें वाङ्मयीन दृष्ट्या अत्यंत हिणकस असून तीं त्यांत ज्योत्स्ना भोळे काम करतात म्हणून गाजलीं असा खोडसाळ आरोप कांहीं टीकाकारांकडून केला जातो. परंतु या आरोपांत यत्किंचितही तथ्य नाहीं असें माझें स्पष्ट मत आहे. नवीन रंगभूमीला साजून दिसतील अशीं नवीन तंत्रानें सज्ज अशींच हीं नाटकें आहेत. आणि हीं नाटकें लिहून रंगभूमीच्या उद्धाराला रांगणेकरांनीं हातभार लावला आहे.

रांगणेकरांच्या आजवरच्या नाटकांत त्यांनीं समाजांतील ढोबळ दोषांवरच कोरडे ओढले आहेत. पण रांगणेकर, आपण समाजाचें अंतरंग अवलोकन करून, त्यांतील अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांच्या अनुरोधानें नाटकें लिहिलीं नाहींत. गाल्सवर्दीचें ' Justice ', इब्सेनचें ' Pillars of Society ' अशा-सारखें एकादें नाटक आपण लिहावें ही माझी दुसरी अपेक्षा आहे.

रांगणेकर, यावेळीं एक धोक्याचा इशारा आपल्याला देणें मला भाग पडत आहे. रांगणेकर, आपण ' कुलवधू 'च्या टीकाकारांना म्हणजेच के० नारायण काळयांना आणि प्रो. फडक्यांना जें टीकेच्या नव्हे वैयक्तिक टीकेच्या प्रतिहल्ल्यानें उत्तर दिलेंत, तें धोरण आपण अंगिकारायला नको होतें. रांगणेकर, काकासाहेब खाडिलकरांच्या ' मेनका ' नाटकावर तात्यासाहेब केळकरांनीं जरी हृदयविदारक आणि मत्सरग्रस्त टीका केली तरी काका-साहेबांनीं त्याला कधीं वैयक्तिक टीकेनें उत्तर दिलें आहे काय ? माधवराव जोशी याच्या विनोदी नाटकावर अश्लीलमार्तंडांकडून टीकेचे सतत हल्ले चढवण्यांत आले. परंतु त्यानीं कधीं टीकाकारांच्या टीकेची परतफेड केली आहे काय ? नाहीं-- कधींच नाहीं ! आणि म्हणूनच मी सांगतों कीं रांगणेकर तुम्ही अशा टीकाकारांना तोंड देऊं नका. खरा नाटककार नाटकें

लिहीत असतो. कोण काय म्हणतोय्– आणि काय बडबडतोय याकडे त्याचे लक्षच नसतें. A True dramatist never barks ! हें तत्त्व अंमलांत आणा. आपलाच त्यांत भाग्योदय आहे.

रांगणेकरांनीं 'कुलवधू'ची टीम घेऊन ते भूगाऊ पिक्चर्सतर्फे 'कुबेर' नांवाचा मराठी बोलपट काढीत आहेत. ते आतां खरेखुरे धंदेवाइक झाले असल्यामुळें या वेळीं त्याना बोलपटांत नक्की यश येईल याबद्दल मला म्वात्री आहे.

रांगणेकरांचें एका वाक्यांत वर्णन करा– असा प्रश्न जर कोणीं विचारला तर मी सांगेन—

'हातीं घेईल तें तडीस नेणारा महाराष्ट्रांतील एकमेव साहित्यिक म्हणजेच मो. ग. रांगणेकर !'

# १२ : अपेक्षापूर्ति केलेल्या व्यक्ती

आतांपर्यंत मीं अकरा व्यक्तींचा परिचय करून दिला. त्यांच्या कार्याचें सांगोपांग विवेचन केलें आणि त्यांच्याबद्दलच्या लोकांच्या अपेक्षा काय होत्या, आणि या व्यक्तींनीं त्या कितपत पुऱ्या केल्या हें खुलासेवार दाखवलें.

आतां या लेखांत अपेक्षापूर्ति केलेल्या व्यक्ती महाराष्ट्रांत कोणकोणत्या आहेत, याचा विचार करण्याचें मीं ठरवलें असून, या व्यक्तींबद्दल प्रथम कोणत्या अपेक्षा महाराष्ट्रीय जनतेनें मनाशीं बाळगल्या होत्या, आणि त्यांची पूर्तता या व्यक्तींनीं कशी केली हें चिकित्सक दृष्टीनें आणि आटोपशीर-पणानें अवलोकन करण्याचें मीं योजिलें आहे.

अपेक्षापूर्ति केलेल्या व्यक्ती कोण हें पाहूं गेलें तर श्री. तात्यासाहेब केळकराची घळघळीत मूर्ति नजरेसमोर प्रथम येते. त्यानंतर सध्या कृष्णा-तटाकीं आपला वार्धक्यकाळ घालवणाऱ्या श्री. काकासाहेब खाडिल-करांकडे आपलें लक्ष जातें. प्रो. डी. बी. देवधर हे क्रिकेटपटु नंतर दृष्टीसमोर येतात. त्यानंतर बालगंधर्वांची प्रशांत मुद्रा हल्लींच्या त्यांच्या केविलवाण्या स्थितीचें अवलोकन करण्यांत गढून गेलेली आढळते. आणि सरतेशेवटीं हिंदुस्थानचे श्रेष्ठ दिग्दर्शक व्ही. शांतारामच राहातात.

* * *

" क्रिकेट–टेनिस वगैरे खेळ कितीक लोक उत्तम खेळतात. पण त्यांच्या-पैकीं प्रत्येकाला त्या त्या खेळाविषयीं सशास्त्र, सुंदर व मनोरंजक चर्चा करतां येईल असें नाहीं ! शिक्षक, सेनापति, वगैरेसंबंधीं असेंच आहे. साहित्यांतील काव्य नाटकादि जे प्रकार आहेत त्यांत नामांकित कामगिरी करून तद्विषयक चर्चा करणें फारच थोड्यांना साधतें. कालिदास, भवभूति, ज्ञानदेव, तुकाराम, मोरोपंत इत्यादिकांनीं रसपूर्ण काव्यें लिहिलीं. पण रसचर्चा त्यांना साधली

नाहीं. पण ज्यांना ती साधली अशा ज्ञानयोग्यांपैकीं श्री. नरसिंह चिंतामण केळकर हे एक आहेत. "— कै. प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याबद्दल हे जे उद्गार काढले आहेत ते महाराष्ट्रांतील कोणत्याही टीकाकाराला खोडून काढतां यावयाचे नाहींत. कै. वामनराव जोशानीं काढलेले हे उद्गार, केळकरांचें समग्र वाङ्मय वाचणाऱ्याला, किती समर्पक आहेत हें कळून येईल.

श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या कार्याचें मूल्यमापन करणें हें एक अवघड काम आहे. सह्याद्रिसारख्या अफाट पसरलेल्या त्यांच्या कार्यश्रीचें महत्त्वमापन करतांना, प्रथम त्यांचा उल्लेख 'एक आदर्श संपादक' असाच करावा लागेल. 'पुष्कळ लिहावयास व वाचावयास सांपडावें' म्हणून मी 'केसरी' संस्थेंत प्रविष्ट झालों, असें खुद्द केळकरांनींच एके ठिकाणीं म्हटलें आहे. आणि गंमत अशी कीं 'केसरी' संस्थेंत प्रवेश करतांना केळकरांनीं अंतरीं बाळगलेली ही अपेक्षा सर्वथैव सफल झाली. केळकरांना प्रथम लोकमान्य टिळकांपासून संपादकीय शिक्षण मिळालें. आणि आपल्या संपादकीय कारकिर्दींत त्यांनीं 'लोकांना शहाणे करणें' हें जें संपादकाचें आद्य कर्तव्य तें चोख बजावलें. केळकरांचे सर्व संपादकीय लेख स्वदेशाबद्दलची आत्यंतिक कळकळ, आणि हिंदु संस्कृतीचा जाज्वल्य अभिमान, यांनीं परिपक्व असल्यामुळें ते लोकांना अतिशय आवडत असत. त्यांचें संपादकीय लिखाण क्विनाइनच्या गोळ्यांसारखें असे. उपमा व विनोद यांची मूळ विषयाशीं सांगड घालून केळकर संपादकीय लेख लिहीत. आणि त्यांची ही शैली महाराष्ट्रांतील इतर संपादकांनीं नंतर आत्मसात् केली. संपादकास जरूर असणारा तत्त्ववेत्याचा अभिनिवेश ज्याप्रमाणें केळकरांच्या संपादकीय लिखाणांत वारंवार दृष्टीस पडतो त्याचप्रमाणें संपादकांना लागणारी निर्भयताही त्यांच्या अंगीं असल्याचें प्रत्ययास येतें. संपादक या नात्यानें केळकरांनीं 'केसरी'चें व्यक्तिमत्व अबाधित राखलें. संपादक म्हणून केळकरांसंबंधीं ज्या ज्या अपेक्षा होत्या त्या त्या त्यांनीं पुऱ्या केल्या. चिस्तीदास पाल, सी. वाय चिंतामणी, या श्रेष्ठ संपादकांच्या मालिकेंत श्री. केळकरांचा जरूर समावेश करावा लागेल.

केळकरांसारखा चतुरस्र व अष्टपैलू लेखक आजपर्यंत मराठी वाङ्मयांत झाला नाहीं. त्यांनीं आजपावेतों जें जें लिखाण केलें त्याचा बहुसंख्य भाग वर्तमानपत्री लिखाणांत मोडतो. परंतु त्यांचें चरित्रात्मक लिखाणही कांहीं थोडें-थोडकें नाहीं. लोकमान्य टिळक, गॅरिबाल्डी, व आयर्लंडचा इतिहास वगैरे चरित्रें त्यानीं लिहिलीं. आणि ‘ केसरी ’चे संपादक असतांना दहा-पंधरा थोर लोकांवर त्यांनीं मृत्युलेखही लिहिले. मोतीलाल नेहरूंवर केळकरांनीं लिहिलेला मृत्युलेख तर मी मरेपर्यंत विसरणार नाहीं ! हिंदुस्थानांतील चळवळीस उपमानभूत झालेला आयर्लंडच्या चळवळीचा त्यानो लिहिलेला इतिहास त्यांच्या देशभक्तीचें द्योतक आहे. टिळक-चरित्रांतील केळकरांची विवेचनशैली मुद्देसूद आणि म्हणूनच आकर्षक आहे. बॉस्वेल, मोर्ले, जॉन्सन या प्रसिद्ध चरित्रकारांप्रमाणेंच केळकर हेही श्रेष्ठ दर्जाचे चरित्रकार म्हणून गाजले. चरित्रकार या नात्यानें केळकरांनीं लोकांच्या सर्व अपेक्षा पूर्ण केल्याच, परंतु चरित्रें कशीं लिहावीत याचा भावी पिढीला एक धडा घालून दिला. या दृष्टीनें केळकरांची कामगिरी फार मोठी आहे.

‘ नाटककार ’ म्हणून केळकरांचा बोलबाला आहे. खाडिलकर, गडकरी, अत्रे, माधवराव जोशी, रांगणेकर, यांच्या इतका झाला नसला तरी अभिजात नाट्य-वाङ्मयाच्या कसोटीवर त्यांचीं नाटकें पारखलीं तर, तीं श्रेष्ठच दर्जाचीं आहेत असा अभिप्राय नाट्य-वाङ्मयाच्या चिकित्सकालासुद्धां द्यावाच लागेल. कथाविषयाची योग्य निवड, प्रसंगाचें रचनाकौशल्य, तसेंच उत्कृष्ट स्वभावलेखन, अर्थपूर्ण आणि अलंकारानीं नटलेले संवाद व जरुरीपुरताच विनोद, हे केळकराच्या नाटकाचे विशेष सांगतां येतील. केळकरांचीं ‘ तोतयाचें बंड ’, ‘ चंद्रगुप्त ’, ‘ अमात्यमाधव ’, ‘ कृष्णार्जुन-युद्ध ’, हीं लिहिलेलीं नाटकें चित्ताकर्षक नाट्य मंडळीनें रंगभूमीवर आणलीं. ‘ तोतयाचें बंड ’ हें नाटक मुंबई, नागपूर, व कर्वे विद्यापीठानें पदवी परीक्षेच्या अभ्यासाकरिता लावलें आहे. त्याच्या वीर-विडंबन, संत भानुदास, सरोजिनी या नाटकांना लोकाश्रय लाभला नाहीं. केळकरांच्या नाटकात कथानकाची गुंतागुंत असते. परंतु ती गुंतागुंत एकादा वैदिक ब्राह्मण गुंतलेलें यज्ञोपवीत जसें सोडवतो तशी हळुवार हातानें सोडवली आहे. आणि हाच गुण अभिजात

नाटककाराला असावा लागतो. केळकरांच्या नाटकांतील पात्रें वास्तववादाच्या मुशींतून तयार केलेलीं वाटतात. एकाद्या नदीचा प्रवाह जसा संथ वाहात असतो तशी केळकरांच्या नाटकांतील भाषा आहे. गडकऱ्यांच्या नाटकांप्रमाणेंच केळकरांच्या नाटकांत हास्यरस व करुणरस बरोबरच वाहात असतात. केळकरांच्या नाटकांतील सर्वांत श्रेष्ठ गुण म्हणजे तीं अश्लीलतेपासून सर्वस्वीं अलिप्त आहेत, घरांतील सर्व मंडळींनीं एकत्र बसून पाहावें इतकें सोज्ज्वल त्यांचें कोठलेंही नाटक आहे. नाटककार या नात्यानें केळकरांनीं प्रेक्षकांच्या अपेक्षा संपूर्णतया सफल केल्या.

"इंद्रधनुष्यांत जरी सात रंग असले तरी त्यांतील हिरवा, पिवळा व तांबडा हेच रंग ज्याप्रमाणें उठून दिसतात, त्याप्रमाणें केळकरांच्या वाङ्मयांतील विनोद हा अधिक खुलून दिसतो" हे खांडेकरांचे उद्गार अगदीं समर्पक आहेत. केळकरांच्या अंगीं विनोदाचा गुण उपजत असावा कीं, त्यांचे सहध्यायी कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या सहवासांत त्यांना लाभला असावा हा वादग्रस्त मुद्दा आहे. एकादा वैद्य ज्याप्रमाणें कडू औषध मधांतून चाटायला लावतो, त्याप्रमाणें आपलें एकादें मत लोकांच्या गळीं उतरवायचें असेल तर संपादकाला विनोदाचें साहाय्य घ्यावें लागतें. सामान्य विषयांतून विनोद उत्पन्न करणारा एक असामान्य साहित्यिक असे म्हटल्यानेंच केळकरांचा यथार्थ गौरव केल्यासारखें होईल.

केळकर हे सावरकरांसारखे किंवा प्रो. फडक्यांसारखे श्रोत्यांवर आपल्या भाषणानें छाप पाडणारे वक्ते नसले तरी त्यांचें भाषण म्हणजे एक चमचमीत मेजवानी असते हें निश्चित ! 'बर्क' याचा ज्याप्रमाणें An orator-writer असा उल्लेख केला जातो तसाच केळकरांचाहि करावा लागेल.

वरील सर्व गोष्टींत जसे केळकर आपल्या अंगच्या गुणांनीं चमकले तसेच ते महाराष्ट्रांतील कोठल्याही पुढाऱ्यापेक्षां राजकारणांतहि चमकले. १४सप्टेंबर १८९७ सालीं जेव्हां रँडसाहेबाच्या खुनाबाबत धरपकड झाली तेव्हां त्यांत लोकमान्यांनाहि पकडलें. आणि १९ सप्टेंबर १८९७ सालीं केसरी-मराठा हीं पत्रकें केळकरांच्या संपादकत्वाखालीं निघूं लागलीं. याच दिवशीं केळकराचा राजकीय दृष्ट्या खरा जन्म झाला. १८९६ सालीं केळकर टिळकांना

येऊन मिळाल्यापासून तों टिळक स्वर्गवासी होईपर्यंत टिळकांच्या विचार-सरणीनें केळकरांवर पूर्ण छाप पाडली होती. १९२२ सालीं राष्ट्रीय सभेंत जे दोन तट पडले, त्याच्या दुसऱ्या तटांत म्हणजे ज्यांना गांधीजींचें नेतृत्व मान्य नव्हतें त्यांत केळकर शिरले. केळकराना गांधींनीं माजविलेलें खादीचें आणि अहिंसेचें अवास्तव स्तोम बिलकूल मान्य नव्हतें. आणि गांधींच्या कौन्सिल—बहिष्काराला तर त्यांचा कडकडीत विरोध होता. यापुढेंही गांधींचें आणि केळकरांचें राजकारणांत कधींच जमलें नाहीं. आणि केळकरांनीं नंतर लोकशाही-स्वराज्य-पक्ष काढला. आणि राजकारणांत अजूनही ते मधूनमधून भाग घेतातच.

अशा रीतीनें केळकरांनीं साहित्यांत, वृत्तपत्रांत, राजकारणांत, महत्त्वाची कामगिरी करून आमच्या सर्व अपेक्षा पुऱ्या केल्या; आणि म्हणूनच अपेक्षापूर्ती केलेल्या व्यक्तींत मी त्यांना अग्रपूजेचा मान देतों.

* * *

गेलीं बरींच वर्षें श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे विविध नात्यांनीं महाराष्ट्रास सुपरिचित आहेत. परंतु इतर सर्व नात्यांपेक्षां 'नाटककार' म्हणूनच त्यांची विशेष प्रसिद्धी आहे.

गेल्या चाळीस वर्षांत रंगभूमीवर कै. गडकरी, कै. कोल्हटकर, कै. औंधकर ना. वि. कुलकर्णी, मामा वरेरकर, माधवराव जोशी, केळकर, ओक, वर्तक, टिपणीस, टेम्बे, वसंत शांताराम देसाई, आणि खाडिलकर वगैरे बरेच नाटककार उदयास आले. पण यांतील कांहीं उदयाक्षणींच अस्त पावले. या सर्वांमध्यें खाडिलकरांची बरोबरी फक्त गडकरीच करूं शकतील. संख्येच्या दृष्टीनें जरी हल्लींचे कांहीं नाटककार भाराभर नाटकें लिहीत असतील किंवा इब्सेनचें बाळंतपण करण्याचा जरी कांहीं लोकांनीं प्रयत्न केलेला असला—तरी खाडिलकरांच्या नाटकाइतकी प्रभावी नाट्यकृति कोणालाही निर्माण करतां आली नाहीं. नाट्य-वाङ्मयाच्या इतिहासांत खाडिलकराचें नांव चिरंजीव होऊन राहील. आणि म्हणूनच त्यांना नाट्याचार्य असें संबोधलें जातें.

स्वतंत्र कथानकें लिहून रंगभूमीवर आणण्याचा उपक्रम प्रथम कै. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं सुरू केला. आणि तोच उपक्रम काकासाहेब खाडिल-

करांनीं पुढें चालू ठेवला. खाडिलकरांच्या नाटकांचें वैशिष्ट्य म्हणजे त्या त्या काळच्या वातावरणांतील कोणत्या तरी व्यक्तीच्या अभिनिवेशांत त्यांच्या नाटकांतील पात्रें सजलेलीं असायचीं. आणि तत्कालीन परिस्थितीवर त्यांचीं नाटकें उभारलीं गेलीं असल्यामुळें त्यांच्या नाटकांना राजकारणाचा वास यायचा.

खाडिलकरांच्या सर्व नाटकांकडे दृष्टिक्षेप टाकल्यास तीं विषयप्रधान आहेत हें चटकन समजतें. ' कांचनगडची मोहना ' या नाटकात स्वराज्य-प्राप्तीचा उपदेश केला आहे. ' बायकांचें बंड 'मध्यें स्त्री-पुरुषांच्या समानतेचा खेळखंडोबा रंगवला आहे. ' भाऊबंदकी 'मध्यें भाऊबंदकीचे दुष्परिणाम वर्णिले आहेत आणि ' प्रेमध्वज ' यामध्यें हिंदु-मुसलमानाच्या वैरा ग एकीचें वळण लावण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें आदर्श पुरुष कसा असावा हें ' सत्त्वपरिक्षेंत ' सांगितलें आहे. आदर्शपुत्र कसा असावा हें ' सवतीमत्सर 'मध्यें वर्णिलें आहे. आणि आदर्श स्त्री कशी असावी हें ' द्रौपदी 'मध्यें रंगविलें आहे. पुराणांचें नावीन्यपूर्ण स्वरूप न बदलतां त्या कथानकावर आधुनिक आचार-विचार आणि उच्चारांच्या छटा मारून खाडिलकरांनीं तीं चित्रें रसिकांपुढें रसग्रहणासाठीं ठेवलीं. '

खाडिलकरांच्या कोणत्याही नाटकांतल्या पात्राचें स्वभावविश्लेषण जर आपण केलें तर प्रत्येक पात्राचें स्वभावरेखाटन खाडिलकरांनीं आत्मीयतेच्या नाजुक कुंचल्यानें केल्याचें आपल्या प्रत्ययास येतें.

खाडिलकरांचें नाट्य-वाङ्मय हें ज्याप्रमाणें विनोदाच्या मुशींतून ओतलेलें नाही, त्याप्रमाणें तें कारुण्याच्या कुपींतूनहि उतरलेलें नाहीं. त्याचें कोणतेंही नाटक गडकऱ्यांच्या ' भावबंधन 'प्रमाणें विनोदप्रधान नाहीं कीं त्याचें एकही नाटक करुणरसानें ओथंबलेलें नाहीं. खाडिलकरांच्या नाटकांतील हास्यरसानें प्रेक्षकांचें पोट दुखत नाहीं कीं त्यांच्या नाटकांतील करुणरसानें प्रेक्षकांचे हातरुमाल भिजत नाहींत. नाट्य-कथानकाचा विस्तार— आणि विकास होत असतांना मधून मधून जो काय हास्यरस आणि करुणरस निर्माण होईल तेवढाच ! खाडिलकरांचीं नाटकें ध्येयदर्शी असल्यामुळें

आणि अशा ध्येयदर्शी नाटकांत हास्यरसाला फारसा वाव नसल्यामुळें या रसाचा अभाव त्यांच्या बहुतेक नाटकातून दिसतो. तरीही तीं निरस होत नाहींत हेंच वैशिष्ट्य आहे.

खाडिलकरांचीं सर्वच नाटकें वीररस आणि शृंगाररस यांनीं परिपूर्ण भरलेलीं आहेत. हे रस नाटकांत आणण्यांत खाडिलकरासारखा नाटककार अद्यापपर्यंत झाला नाहीं. मामा वरेरकरांनीं, माधवराव जोशांनीं, आचार्य अत्र्यांनीं, स. अ. शुक्लांनीं हे रस संपूर्णतया आपल्या नाटकांतून हाताळण्याचा प्रयत्न करून पाहिला, परंतु त्यांपैकीं कोणालाही खाडिलकरांइतकें प्रभावी नाटक लिहितां आलें नाहीं. प्रचारकी थाटाचीं नाटकें लिहिणारें म्हणून मामा वरेरकरांची संभावना झाली. अश्लील आणि सदभिरुचीला सोडून नाटकें लिहिणारे म्हणून माधवराव जोशावर भडिमार झाला. कथानकापेक्षां शाब्दिक कोट्यांचें अवडंबर नाटकातून माजवणारे म्हणून आचार्य अत्र्यांचा लौकिक झाला. आणि लहान मुलांना आवडेल असें नाटक लिहिणारे म्हणून स. अ. शुक्लांना संबोधण्यांत आलें. शृंगाररस आणि वीररस नाटकांतून एकाच वेळीं खेळविण्याची कला साधणें महा कठीण, आणि खाडिलकरांना ही कला आत्मसात् करून घेतां आली; म्हणून तर त्यांचीं नाटकें लोकप्रिय झालीं. खाडिलकरांच्या काळांतील पिढीला, म्हणजे आजच्या वृद्ध लोकांना, त्यावेळीं नाटकांतून विनोदी वातावरणापेक्षां किंवा आजकालच्या नाटकांतून दिसून येणाऱ्या पांचटपणापेक्षां शृंगारादिक वातावरण किंवा बाहू स्फुरतील असें वीररसप्रधान नाट्य आवडत असे. खाडिलकरांनीं लोकांच्या आवडीचा कानोसा घेऊनच आपल्या नाटकांतून ह्या दोन रसांसा दुथडी वाहूं दिलें. परंतु एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवावयास पाहिजे कीं, शृंगाररसाला वाव देतांना त्याचें बीभत्स रसांत रूपांतर होऊं न देण्याची त्यांनीं विलक्षण काळजी घेतली होती. कांहीं ठराविक मर्यादेपर्यंतच शृंगाररसाला वाव द्यायचा हें त्यांनीं अंगिकारलेलें धोरणच त्यांना श्रेष्ठ नाटककाराच्या सिंहासनावर बसवण्यास कारणीभूत झालें आणि म्हणूनच मी म्हणतों कीं, खाडिलकरांइतका श्रेष्ठ नाटककार अद्याणपर्यंत झाला

नाहीं. त्याचे असे एकहि नाटक नाहीं की त्यांतील शृंगाररसानें प्रेक्षकाचे चित्त हरण होत नाहीं.

या दृष्टीनें पाहता खाडिलकर यानी नाटककार या नात्याने आपल्या सर्व अपेक्षा परिपूर्ण केल्या आहेत.

* * *

"Here is 52 years old Professor Deodher comming to the wicket–" हा बॉबी तल्यारखानाच्या 'माइक'मधून जगजाहीर होणारा देवधराचा लौकिक आपण सर्वांनीं ऐकला आहे. बावन्न वर्षांचा हा वृद्ध तरुण अजूनहि क्रिकेटच्या क्षेत्रात पराक्रम करीत आहे, हें ऐकून कोणाचे अंतःकरण उचंबळून येणार नाहीं ?

देवधराचा क्रिकेटच्या आयुष्यातील जन्म १९११ सालीं झाला. त्यावर्षी त्यानीं आपल्या बॅटिंगचें सर्व कौशल्य प्रकट करून पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजला नॉर्थकोट शील्ड मिळवून दिलें. आणि त्यावेळचा त्याचा तो पराक्रम पाहून असंख्य मनाशीं तर्क बांधला गेला कीं हा खेळाडू अखिल हिंदुस्थानांत आपल्या बॅटिंगच्या कौशल्याची पराकाष्ठा करणार ! १९१२ सालीं त्यानीं मुंबई युनिव्हर्सिटीतर्फे खेळून आपल्या खेळाची पुनः चमक दाखवली. आणि त्याच वर्षी त्याना चौरंगी सामन्याकरिता आमंत्रण आले. परंतु चौरंगी सामन्यात त्याचा खास प्रवेश झाला १९१३ सालीं, ते हिंदु संघाकडून खेळले तेव्हा ! त्या दिवसापासून ते सतत १९३६ सालपर्यंत या सामन्यातून खेळले.

१९२६ सालीं देवधरानीं प्रेक्षकाच्या डोळ्याचें पारणें फेडलें. एम. सी. सी. या विलायतहून आलेल्या संघाविरुद्ध सेंचरी करून त्यानीं आपल्या कौशल्याची परिसीमा केली. या वेळेपासून देवधर रणजी ट्रॉफी वगैरे अनेक सामन्यांतून खेळले, आणि अजूनहि खेळत आहेत; आणि त्यांनीं आजपर्यंत कितीतरी शतकें केलीं आहेत. देवधर म्हातारे झाले तरी अजून खेळूं शकतात. 'देवधरांचा खेळ आतां पूर्वीसारखा राहिला नाहीं. त्यानीं आता रिटायर व्हावें'– असे तोंड आहे म्हणून कोणीही बोलले तरी देवधर त्याकडे लक्ष देत नाहींत. तर शतकें काढून आणि तरुणालाही लाजवील असें फिल्डींग करून आपली लायकी अजूनही सिध्द करीत आहेत.

देवधर निर्व्यसनी आणि नियमित आहारी असल्यामुळेंच ते इतक्या वयांतहि खेळू शकतात. क्रिकेटर होऊं इच्छिणाऱ्या तरुणानें देवधरांचाच आदर्श दृष्टीसमोर ठेवला पाहिजे.

देवधर ब्राह्मण आहेत, दाक्षिणी आहेत, आणि पुणेकर आहेत, म्हणून मुंबईच्या निवड-मंडळानें आजपर्यंत त्यांचा पुष्कळदां अपमान केला आहे. परंतु क्रिकेटमधील या राजानें त्या भुंकण्याकडे कधींच ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. देवधर सतत खेळतच राहिले.

१९११ सालीं देवधरांचा खेळ पाहून लोकांनीं ज्या अपेक्षा हृदयाशीं बाळगल्या होत्या त्या देवधरांनीं पूर्णांशानीं पुऱ्या केल्या. मात्र देवधरांना जातां जाता एक कानमंत्र द्यावयाचा आहे. देवधर, आपलें हसें झालेलें आपणांस पाहावयाचें नसेल तर आपण कृपा करून आता रिटायर व्हावें. यातच आपलें कल्याण आहे.

* * *

'१९१० ते १९४० सालांतील मराठी रंगभूमीचा अनभिषिक्त नट-सम्राट्' असाच उल्लेख नाट्य-वाङ्मयाच्या इतिहासकारांनीं करावा अशी एकच व्यक्ति या महाराष्ट्रांत आहे. बालगंधर्व ! कै. लोकमान्य टिळकांनीं श्री. नारायण श्रीपाद राजहंस यांना 'बालगंधर्व' ही पदवी देऊन गौरवलें, आणि या अभिजात कलावंताचा योग्य सन्मान केला.

बालगंधर्वांनीं मिळवलेलें यश आणि प्रेक्षकांकडून त्यांना मिळालेली लोकप्रियता आजवर रंगभूमीवरील एकाही नटाच्या आणि नटीच्या वांट्याला आलेली नाहीं. पुरुषानें केलेली स्त्री-भूमिका कशी असावी हें महाराष्ट्राला बालगंधर्वांनींच दाखवलें.

बालगंधर्वांचा अभिनय आणि त्यांच्या प्रसन्न मुखावरील हावभाव पाहिले म्हणजे कोणत्याही प्रेक्षकाचें आणि रंगभूमीच्या रसिकाचें अंतःकरण आनंदाच्या उर्मींनीं भरून येत असे. बालगंधर्वांच्या रंगभूमीवरील अभिनयांत स्वाभाविकता होती. रंगभूमीवर ते वसंतसेनेच्या रूपांत येवोत– रुक्मिणीच्या स्वरूपांत येवोत– कीं भामिनीच्या थाटांत येवोत– त्यांच्या सौंदर्यांत पतिव्रतेचें तेज झळकत असे. 'बघुं नको मजकडे केविलवाणा राजसबाळा,'

हें ‘ एकच प्याला ’ मधील पद म्हणतांना त्यांच्या पावित्र्यरूपी मुखावर होणारे करुणरसपूर्ण भाव पाहून तें नाटक पाहणारे प्रेक्षक अक्षरशः स्फुंदत असत.

क्रिकेटमधील नायडूंचा ‘ लेट-कट ’ पाहतांना जो आनंद वाटतो, काणेकरांचा लघुनिबंध वाचतांना जी प्रसन्नता लाभते, उदयशंकरचें नृत्य निरीक्षण करतांना ज्या ऊर्मी उसळून येतात, तितकाच आनंद, तितकीच प्रसन्नता, आणि तितक्या ऊर्मी बालगंधर्वांची ‘ दादा, ते आले ना ! ’ असें लटक्या आवाजात म्हणत ‘ स्वयंवर ’ नाटकांत होणारी ‘ एंट्री ’ पाहून अनुक्रमें होतो, लाभते आणि उसळतात. बालगंधर्व ‘ प्रेमशोधन ’ नाटकांत मद्रासी पद्धतीचा पेहेराव करून येवोत, ‘ स्वयंवर ’ नाटकांत ‘ नाथ हा माझा ’ पद म्हणोत, कीं रंगभूमीवर ‘ एकच प्याला ’ मध्यें अक्षरशः दळोत, प्रत्येक प्रसंगीं बालगंधर्वांचा अभिनय आत्मीयतेनें वठलेला असे. आणि म्हणून ह्या अभिनयानें प्रेक्षकांचीं अंतःकरणें सुखसंवेदनेनें भरून येत असत. आपल्या नेटक्या अभिनयानें बालगंधर्वांनीं तरुण आणि वृद्ध स्त्रीपुरुषांना सतत झुलवलें; आणि तें इतकें कीं महाराष्ट्रांतील कित्येक स्त्री-पुरुषांनीं बालगंधर्वांचें सहीसही अनुकरण केलें. रंगभूमीवरील आपल्या वेशभूषेनें त्यांनीं स्त्रियांना इतकें वेडें केलें कीं ते रंगभूमीवर ज्या तऱ्हेचीं पातळें नेशीत त्या पद्धतीचीं पातळें स्त्रिया नेसूं लागल्या ! ते ज्या पद्धतीची केशभूषा करीत ती पद्धत एक केसभरही फरक न करतां स्त्रिया अवलंबूं लागल्या ! बोलपट जमान्यांतील एकाही नटीच्या वांट्याला इतके अनुकरणप्रिय शिष्य लाभले नसतील !

“ मला गाणें ऐकावेंसें वाटलें तर मी गंधर्वांच्या नाटकाला जातों. ” असे उद्गार प्रसिद्ध उस्तादी संगीतज्ञ अल्लादियाखां यांनीं काढले होते. रंगभूमीवरील बालगंधर्वांचें संगीत ज्यांनीं ज्यांनीं ऐकलें आहे त्यांनीं त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं, ‘ रंगभूमीवर गावं नारायणरावांनींच ! ’ ‘ यमुना जळिं खेळूं खेळ ’ या मीनाक्षीच्या गाण्याला किंवा ‘ वारा फोंफावला ’ या वाटव्यांच्या भावगीताच्या वांट्याला जी लोकप्रियता लाभली नाहीं, तितकी लोकप्रियता बालगंधर्वांनीं गायिलेल्या ‘ करित यदुमनीं सदना ’ ‘ कशी या त्यजूं पदाला ’ ‘ चंद्र चवथिचा ’ या पदांना मिळाली आहे.

मराठी रंगभूमीवर जर आजवर कोणाचें अधिक कोडकौतुक झालें असेल तर ते बालगंधर्वांचें ! गोड गळा आणि स्त्रीच्या तोंडांत मारील असें सौंदर्य या दोन गुणांची जोड मिळून या भांडवलावरच बालगंधर्वांनीं आपल्या भूमिकांची पेढी उघडल्यामुळें ते रंगभूमीचे एक आकर्षण होऊन बसले !

रंगभूमीच्या रसिकांनीं बालगंधर्वांसंबंधीं ज्या अपेक्षा आरंभापासून बाळगल्या होत्या, त्या सर्व त्यांनीं रंगभूमीवरील आपल्या अतुलनीय अभिनयानें आणि गोड गाण्यानें पुऱ्या केल्या, आणि रंगभूमीवर आपलें नांव अजरामर करून ठेवलें. नारायणराव, देवधरांना मीं जो कानमंत्र दिला तो आपणांसहि द्यावयाचा आहे. आपण मराठी रंगभूमीची सेवा आजपावेतों खूप केलीत. आतां आपण आपल्या शरिराला त्रास करून न घेतां 'हरि-हरि' म्हणत उरलेलें आयुष्य ईश्वर-नामस्मरणांत घालवावें. ऐका हं देवा एवढं.

* * *

आजपर्यंत शांतारामबापूंचें वर्णन त्यांच्या चाहत्यांनीं व टीकाकारांनीं, 'दिग्विजयी दिग्दर्शक', 'सामान्य माणसाकडून असामान्य भूमिका करून घेणारे कलावंत', 'लोकांच्या आवडीनिवडीच्या प्रवाहाबरोबर वाहात न जातां खऱ्या पोहणाऱ्याचें कौशल्य प्रकट करून, आम्ही पोहतों तें प्रवाह अनुकूल असताना असें नव्हे, तर प्रतिकूल प्रवाहाबरोबर सुद्धां पोहूं शकतों, असें दाखविणारे झुंजारवृत्तीचे शांतारामबापू,' 'नवीन वस्तु हातांत देतानासुद्धां गिऱ्हाइकाना ती वस्तु आवडली तर पाहिजे, परिचयाची तर वाटली पाहिजे-आणि पुनः ही गोष्ट इतक्या दिवस आपल्या नजरेंतून सुटली कशी, या हुरहुरीनें त्याला थोडाफार खेदही झाला पाहिजे, असें नवीन परंतु शोधलेलें नावीन्य देणारे कलावंत' असा उल्लेख केला असेल. परंतु मी त्यांचा उल्लेख 'Life is for living'– आयुष्य हें जगण्याकरितां आहे, अशा तऱ्हेचा सूचक संदेश देणारे दिग्दर्शक असाच करीन.

प्रो. फडक्यांच्या कॉलेजजीवनाविषयीं बोलतांना एका माझ्या मित्रानें असे उद्गार काढल्याचे मला आठवतात. 'फडके कॉलेजांत असतांना—त्यांचें कॉलेजांत लक्ष कमी ! सारें लक्ष इतर गोष्टींकडे.' दुसऱ्या एका प्रोफेसरासंबंधीं असेंच माझ्या कानीं आलें होतें. परीक्षेपूर्वी स्वारी नेहमी

क्रीडांगणावर असे. या गोष्टीचा उल्लेख करण्याचें कारण असें कीं, क्रीडांगणावर हजर असणारा प्राध्यापक परीक्षेंत पहिला येतो. कॉलेजाव्यतिरिक्त इतर भानगडींकडे हौसेनें लक्ष पुरविणारे फडके यशस्वी रीतीनें परीक्षा पास होऊं शकतात. ह्याचा संबंध एकमेकाशीं कसा लावावा हें शोधण्यांत गंमत आहे. शांतारामबापू सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपल्या स्टुडिओमध्यें चालू असणाऱ्या बोलपटासाठीं मेहनत घेतात. मुलाखतीसाठीं येणाऱ्या इसमाला मुलाखत देतात. टेबलावर पडलेल्या कुचेष्टा आणि कौतुक करणाऱ्या पत्राचा समाचार घेतात. पुढें येणाऱ्या चित्रपटाचें कथानक कोणतें निवडायचें ह्यासंबंधींचे त्याच्या डोक्यात विचार घोळत असतात. तेव्हां ह्या साऱ्या चक्रव्यूहांतून मी शांतारामबापूंना जें म्हणणार आहें—— समाज-निरीक्षक म्हणून——तें कसें ? समाजाचा शांतारामबापू अभ्यास कसा करतात हें सांगितलें पाहिजे.

शांतारामबापूंचें अप्रकट मन हीच निरीक्षणाची ठेव असलेली मोठी थोरली पेढी होय. जरूर लागेल त्या वेळेला स्वतःच्या या अनुभवाच्या पेढीवर ते चेक वटवीत असतात. एकादा प्रोफेसर त्यांच्याकडे आला तर आपलीं गाऱ्हाणीं त्याच्यापुढें न मांडतां त्याच्याच जीवनाविषयीं आस्थेवाईक-पणें चौकशी करून अनुभवाचे कण टिपून घेतील. एकादा विद्यार्थि आला तर त्याच्या जीवनाचा आस्वाद ते खुबीदारपणें चाखूं शकतील. एकादा भिकारी मोठ्या आशेनें ज्यावेळीं त्यांच्याकडे पाहूं लागतो, त्यावेळेपासून त्याला पैसे देईपर्यंत त्याच्या खऱ्याखोट्या बतावणीच्या हेतुपुरस्सर हालचाली अंतःकरणावर कोरून ठेवतील. शांतारामबापू स्वतःच्या त्याच्या पैशासंबंधीं-च्या अपेक्षा वाढवून ठेवतील आणि त्याचीं निराशाही करतील. आशा आणि निराशा ह्या आयुष्याच्या हेलकाव्यांची नोंद करून त्याचा उपयोग ते बोलपटांत करतील. मोटारींतून जातां जातां तरुण-तरुणींच्या संवादाचा ते कानोसा घेतील. तसेंच कोण कसें उभें राहिलें आहे, कसे बोलतात—— ह्या-संबंधींची माहिती परिश्रमपूर्वक अभ्यासतील; तर कित्येक वेळां कोणाला कळत न कळत रस्त्यानें जातांना कित्येक ठिकाणीं विशेष पाहण्याजोगें असल्यास त्या ठिकाणीं एकाद्या वेड्यासारखे उभे राहतील. कांहीं वेळेला तें

आगगाडींतील तिसऱ्या वर्गांतील उतारूंशीं समरस होतील. निरनिराळ्या विचारांचें प्रतिनिधित्व पत्करणाऱ्या लेखकांच्या वाङ्मयकृतींतील अनुभवाचे प्रसंग पारखून पाहतील. शांतारामबापू खरेखुरे समाजनिरीक्षक आहेत. आणि म्हणूनच त्यांनीं दिग्दर्शित केलेले सर्व बोलपट यशस्वी झाले. आणि म्हणूनच मी म्हणतों कीं त्यांनीं दिग्दर्शक या नात्यानें आपल्या सर्व अपेक्षा पुऱ्या केल्या.

सिनेमाक्षेत्रासारख्या अत्यंत मोहाच्या, अत्यंत चंचल आणि अस्थिर वातावरणात– इतक्या मनोनिग्रहानें वागणारे शांतारामबापू पाहिले, कीं मला एकाच गोष्टीची आठवण होते. हलणाऱ्या बोटीच्या डेकवर निर्धास्तपणें, न डगमगतां— समुद्राच्या वैभवाकडे न्याहाळून पाहणाऱ्या मासणाकडे बोट दाखवावें असें वाटतें! शांतारामबापू हे न डगमगणारे, पक्कें पाऊल समजून उभे राहाणारे, आपलें म्हणणें, आत्मविश्वास आणि तेजस्वी वाणीनें सांगणारे जोमदार, श्रेष्ठ प्रतीचे प्रतिभासंपन्न दिग्ददर्शक आहेत.

'अयोध्ये'चा राजा या बोलपटापासून ते तडक 'डॉ. कोटणीस' या बोलपटापर्यंत शांतारामबापूंनी दिग्दर्शित केलेले बोलपट आपण पाहिले तर प्रत्येक बोलपटांत शांतारामबापूचें निराळें वैशिष्ट्य दिसून येतें. समाजाला काहींतरी शिकवण देण्याची त्यांना तळमळ लागून राहिली आहे हें त्यांच्या प्रत्येक बोलपटांत आपल्याला पाह्यला मिळतें. 'जरठ-कुमारी' विवाहाचा जुनाच प्रश्न 'कुंकू' या बोलपटांत पुनः हातीं घेऊन, 'मी दुःख सहन करीन पण अन्याय सहन करणार नाहीं.' हे नीराच्या तोंडचे उद्गार म्हणजे आधुनिक तरुणींच्या अंतःकरणातील विचारांची खळबळ आहे, हें शांतारामबापूंनीं 'कुंकू' बोलपटद्वारें समाजाला पटवून दिलें. 'वेश्या झाली तरी तिलाही मन असतं, भावना असतात' हा संदेश त्यांनीं 'माणूस' बोलपटाद्वारें जनतेला दिला. हिंदु–मुसलमानांच्या ऐक्याचा प्रश्न त्यांनीं 'शेजारी' बोलपटांत कोणाच्याही भावना न दुखवतां हळुवारपणें सोडवला आहे; आणि समाजाच्या, जनतेच्या, पीडितांच्या, सेवेसाठीं प्राणार्पण करण्यासही सिध्द झालें पाहिजे, हें घोषवाक्य त्यांनी 'डॉ. कोटणीस' हा बोलपट काढून घोषित केलें.

शांतारामबापू दगडाचा देव बनवतील किंवा मातीचें सोनें देखील करतील. सरस्वती सिनेटोनच्या ' श्यामसुंदर 'मध्यें ' फेल ' झालेल्या शांता आपटेला 'प्रभात'मध्यें भरपूर वाव देऊन तिचे गुण प्रेक्षकांच्या नजरेस आणले. भालजी पेंढारकरांच्या हाताखालीं न चमकलेल्या शांता हुबळीकरला ' माणूस ' बोलपटात भूमिका देऊन आपण नटीला कसे तयार करतों हें दिग्दर्शकांना दाखवून दिलें.

सिनेमासृष्टींतील सर्वश्रेष्ठ दिग्दर्शक असाच शांतारामबापूंचा मी तरी उल्लेख करीन आणि सिनेमासृष्टींतील टीकाकारांनाही त्यांचा उल्लेख, त्यांच्या दिग्दर्शन-कौशल्याकडे पाहतां, तसाच करणें भाग आहे. नाहीं-करावाच लागेल.

मीं वर वर्णन केलेल्या व्यक्तींनींच फक्त लोकांची अपेक्षापूर्ती केलेली आहे. आणि आतां कोणतीही अन्य व्यक्ती या वर्गात बसण्यास लायक नाहीं किंवा उरलेली नाहीं म्हणा— असें म्हणण्याचा माझा वास्तविक मुळींच हेतु नाहीं. साहित्यक्षेत्र, क्रीडाक्षेत्र, नाट्यक्षेत्र आणि सिनेमाक्षेत्र, या कला-क्षेत्रांत माझ्या समजुतीप्रमाणें या व्यक्तींनींच भरीव कामगिरी करून आपलीं नांवें त्या त्या क्षेत्रांत अजरामर करून ठेवलीं आहेत. आणि ' अपेक्षापूर्ति केलेल्या व्यक्ती ' याखालीं मीं ज्या व्यक्ती निवडलेल्या आहेत त्यांच्या कार्याबद्दल, कोणाचेंही त्यांच्याशी वैर असो अगर स्नेह असो, दुमत होईल असें मला मुळींच वाटत नाहीं. आणि म्हणूनच केवळ या व्यक्ती मी ' अपेक्षापूर्ती ' केलेल्या व्यक्तींमध्यें निवडलेल्या आहेत. त्यांतून आणखी कांहीं व्यक्ती माझ्या नजरेआड राहिल्या असल्यास त्यांच्या कार्यानें माझें मन आकर्षून घेतलें नसावें. अधिक काय लिहावें !

---